# सूड

(एका परित्यक्तेची जीवनकथा)

: लेखक :

दिवाणबहाद्दूर वासुदेव विनायक जोशी

१९४४

—: सोल एजन्ट :—

श्री समर्थ बुक डेपो गिरगांव, मुंबई.

किंमत २ रुपये

: प्रकाशक :

महाराष्ट्र ग्रंथ भांडार—मुंबई ४.

# प्रस्तावना

एका परित्यक्तेचा जीवनक्रम प्रस्तुत सादर करीत आहे. ती कथा अगदीं नित्य आढळणारी आहे. सामाजिक अन्याय व अनिष्ट रूढी ह्यांचा प्रतिकार करून त्यांचें उच्चाटन करतां येईल, असें प्रतिपादन करण्यांत येतें. ह्या युक्तिवादाला कादंबरींतल्या घटनेनें केलेलें आव्हान, हिंदुधर्मशास्त्रांत सुधारणा करण्याच्या प्रयत्नांचा विरोध करणारांनीं, विचारांत घेण्यासारखें आहे. परित्यक्तेलाही अन्नवस्त्राच्या बरोबरीनें आधाराची, आश्रयाची आणि सोबत्याची जरूरी असते. अन्नाच्या क्षुधेच्या बरोबरीनें विषयाची भूक असते ह्याची जाणीवच कुणाला होत नाहीं. रूढीचे पट्टे डोळयाला बांधून चांचपडत चालणारा आंधळा समाज निरपराधी जीवांना खुशाल तुडवीत आहे. परित्यक्तांची संख्या वाढत आहे. अशावेळीं ह्या प्रश्नाकडे समाजसुधारकांनींच काय पण जुन्या मतवाल्यांनींहि लक्ष दिलें पाहिजे; आणि ह्याच हेतूनें ही सुमारें चार वर्षांपूर्वी लिहिलेली कथा आज वाचकांना सादर करीत आहे.

परगांवीं गेल्यानें पहिल्या चौसष्ट पानांचीं मुद्रितें मी तपासूं शकलों नाहीं त्यामुळें अक्षम्य असे जे मुद्रणदोष राहिलेले आढळतील त्याबद्दल मी वाचकांची माफी मागतों.

बडोदें
१५-१२-१९४३

वा. वि. जोशी

## कादंबरींतील व्यक्तींची ओळख:—

**विलास**-मोटार एजंट;
साधारण शिकलेला, मध्यम वयाचा.

**अचला**-विलासाची पहिली टाकून दिलेली बायको;
स्वरूपानें सुरेख, रंगानें गोरी, नाकींडोळीं रेखीव.

**उषा**-विलासाची दुसरी बायको,
श्रीमंत बापाची एकुलती एक मुलगी;
रूपानें साधारण, रंगानें काळी.

**किरात**-लग्न न झालेला;
महिला मासिकाचा संपादक;
साधारण शिकलेला.

**शोभा**-विधवा; पुनर्विवाहोत्सुक;
वनिता-विश्रामांतली शिवण कामाची मास्तरीण;
रूपानें मध्यम.

**जयपाल**-विधूर;
वनिता-विश्राम संस्थेचा माननीय चिटणीस.
सत्याग्रहांत वकिली सोडलेला व तुरुंगांतून जाऊन आलेला सत्याग्रही समाजसेवक;

# १

“ वाचलंत ना पत्र ? ” जयपालानें विचारलें.

“ होय वाचलं. ” अचलेनें गंभीरपणानें उत्तर दिलें. वरून ती गंभीर दिसत होती, तरी क्रोधानें तिला आंतून गदगदां हालविलें होतें, व तिचे हात लटलट कापत होते.

जयपालानें अचलेला तें पत्र वाचावयास दिलें, आणि वरून गंभीरपणा त्यानें स्वीकारला होता, तरी आंतून तो व्याकुळच झाला होता, तो इतका कीं दुर्दैवी अचलेकडे त्याला पाहण्याचें धैर्य होईना. केवळ कर्तव्य म्हणून मनाविरुद्ध अत्यंत अन्यायकारक कृत्य आपणास करावें लागत आहे ह्या भावनेनें त्याचा चेहरा म्लान झाला होता. तो तोंड चुकवीत होता, आणि गोंधळलेली मन:स्थिती लपविण्यासाठीं टेबलावरील कागदपत्र तो उगीचच चाळीत होता.

“ मग तुम्हाला आतां आपली सोय दुसरीकडे कुठेतरी पाह्यली पाहिजे. मला आज रावबहादुरांनीं सकाळीं मुद्दाम बोलावून सांगितलं, तें तुम्हाला मी सांगतो. ”

“ म्हणजे ? ह्या पत्रांतल्या खोट्यानाट्या, वेड्यावांकड्या हकीगती तुम्ही खऱ्याच मानतां तर ! खरी हकीगत काय आहे, हें सांगण्याचीसुद्धां मला संधी नाहीं देणार तर ! ” अचलेचा चेहरा लाल झाला, तिचा आवाज कांपू लागला आणि तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

“ अचलाबाई ! मी हुकमाचा बांधलेला. रावबहादुरांनीं हुकूम दिला, मला त्याचा अंमल करणें भाग आहे. असं कां वाटतं तुम्हाला, कीं ह्या

बाबतींत मी तुमच्यासाठीं त्यांच्याजवळ कांहीं रदबदली केली नसेल! आज रावबहादुरांनीं मला बोलावलं, हें पत्र दिलं तेव्हां मी त्यांच्याशीं खूप भांडलों तुमच्यासाठीं. पण त्यांनीं शेवटीं सांगितलं कीं तिच्या नवऱ्याचीच ज्याअर्थीं तिला बोर्डींगांत ठेवण्यास हरकत आहे, त्याअर्थीं आपल्याला तिला येथें ठेवतां येत नाहीं."

"पण मला टाकून दिली, दुसरं लग्न केलं, आज पांचवर्षांत मी मेलें आहे का जिवंत आहे ह्याची वास्तपुस्त सुद्धां घेतली नाहीं, अशांचा माझ्यावर नवरेपणाचा हक्कच काय राहतो? त्यांनीं तुम्हाला वाटेल त्या धमक्या दिल्या असल्या तरी कोर्टांत मीही खरी हकीगत सांगेन. मला मारझोड करीत, त्याच्या जखमांच्या खुणा अंगावर आहेत, साक्षीदार आहेत. अन् खरी हकीगत ऐकल्यावर सरकार तरी ह्यांचंच म्हणणं मान्य करील का! नाहीं माझी वागणूक जर वाईट असेल तर एक गोष्ट निराळी. विधवा बायकांबद्दल काय कमी पत्रं येतात? त्यांचं तुम्ही चालूं देत नाहीं, अन् माझ्यासारखीलाच मात्र हा त्रास कां?"

"अचलाबाई, रावबहादुरांना मी हें सगळं सगळं सांगितलं. तुम्ही इतके दिवस राहतां, तुमची वर्तणूक चांगली आहे, असं मी त्यांना सांगितलं. पण रावबहादुर म्हणाले, नवराबायकोच्या ह्या झगड्यांत कोर्ट दरबारांत जाण्याचं आपल्याला कारण नाहीं. मी त्यांना म्हटलं कीं, नवऱ्यांनीं टाकून दिलेल्या बायकांच्याबद्दल नेहमी नवऱ्याकडून असा त्रास होतो, त्याची कोर्टांतून एकदां शहानिशा करून घेतली पाहिजे. पण रावबहादुर शेवटीं म्हणाले, कीं विलासांनीं स्वतः संस्थेला मोठी देणगी कबूल केली आहे. शिवाय ओळखीच्या लोकांकडून निदान पंचवीस हजाराच्या देणग्या मिळवून देण्याचं त्यांनीं शिरावर घेतलं आहे. संस्थेला आज एक लाख रुपये कर्ज आहे, मिळेल तेवढा पैसा पाहिजे आहे. म्हणून विलासांच्या सांगण्याप्रमाणं त्यांच्या बायकोला संस्थेंतून काढून टाकण्याशिवाय गत्यंतर नाहीं. मोठ्या मिनतवारीनं त्यांनीं कबूल केलं, कीं बोर्डींगांतून काढून टाकावं, शाळेंत आलांत तुम्ही तरी चालेल."

"मग बोलणंच संपलं! पैशाच्या जोरावर माझा अनन्वीत छळ पचविला पैशाच्या जोरावर हालहाल करून मला उपाशी मारणार आहेत. सूड! सूड!!

सूड घेताहेत जन्मोजन्मी ! ! ! " बोलबोलतां अचलेच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा टपटप गळूं लागल्या. अचलेनें पदरानें डोळे पुसले आणि जयपालाला विचारलें. " मला आजच गेलं पाहिजे का ? "

" छेः ! तुमची सोय लागेतोंवर चार दोन दिवस राहिलांत तरी चालेल ! दुसरी सोय लागेतोंवर मी आपल्या जबाबदारीवर तुम्हांला इथं ठेवीत आहे. " जयपालानें मृदू आवाजांत सांगितलें.

" जायचं कुठें ? " असा एक दीर्घ निःश्वास सोडून अचला ऑफिसांतून निघून गेली.

जयपाल विलासाच्या पत्राकडे शून्य दृष्टीनें पाहत बसला. त्याच्या चेहऱ्यावर क्रोध व करूणा ह्यांच्या छटा दिसत होत्या. असहाय्यतेमुळें तो दीन होऊंन टेबलावर पडलेल्या विलासाच्या पत्राकडे पाहत किती वेळ तरी बसला होता.

" जयपाल, जयपाल, जयपाल, अहो जयपाल, " अशा लाडीक हांका मारीत शोभामास्तरीणबाई ऑफीसच्या खोलींत लगबगीनें शिरली. पातळाचा पदर एका खांद्यावरून पाठीवर लोळत होता, डोक्यांत घातलेलें लांब देठाचें हेलखावे खाणारे गुलाबाचें फूल उंच टाचेच्या बुटाच्या टुमकत चालण्याचा ताल धरीत होतें. जयपाल कांहींच उत्तर देत नाहीं अगर वर आपणाकडेहि पाहत नाहीं हें पाहून शोभाबाई वरमली. तिनें अंगावरचा पदर सांवरला, टेबलावर वाकून हळुच ती म्हणाली "जयपाल, कामांत आहांत का कांहीं ? "

" होय. "

" कुठल्या कामांत ? "

" ह्या कामांत ! " असें बोलून जयपालानें विलासच्या पत्राकडे डोळयानीं खुणावलें.

शोभानें विलासचें पत्र वाचलें आणि कुचेष्टेचें हांसून म्हणाली. " अंः ! त्यांत काय आहे ! तशीच असेल ती ! उगीच का नवऱ्यांनीं तिला टाकली ? "

" ती कशी आहे हा मुद्दा नाहीं. विलासाच्या सांगण्यावरून रावबहादूरांनीं तिला येथून काढून टाकण्याबद्दल मला सांगितलें आहे. आतां ती कुठें जाईल ह्याचा मी विचार करतो आहे. "

" आपल्याला काय करायचं ती कुठें जाईल त्याच्याशी ? जिथून आली तिथें जाईल ती. "

" तुम्हावर सुद्धां एकदां अशी वेळ आली होती. तेव्हां कल्पना येईल तुम्हाला, कीं बायकानं कुठं जाणं किती कठीण असतं तें. "

" नवऱ्यांनीं टाकलेल्यांची आणि आमच्यासारख्या अनाथ बायकांची बरोबरीच का असते ? आम्हाला आधार नसतो. "

" आणि टाकलेल्या बायकांना तरी आधार कुठें असतो ! नवरा असतो त्रास देण्यापुरता. सूड घेण्यापुरता असतो. एकाअर्थी विधवांपेक्षां टाकून दिलेल्यांची स्थिती फार कठीण असते. विधवेला निदान समाजाची सहानुभूती तरी असते. टाकून दिलेलीला कुणीच सहानुभूती दाखवीत नाहीं. नवऱ्यानं टाकली तेव्हां तिचाच दोष असणार असंच जो तो म्हणणार ? ह्याच गोष्टीचा विचार करतां आहे कीं, समजा ती इथून बाहेर गेली तर ती कुठें जाणार ! कुठे राहणार ! विलासांनीं तिला भरचौघांत जरी फटके मारले तरी कुणी तिच्या मदतीला सुद्धां धांवणार नाहीं. कां तर ती नवऱ्याची बायको. "

" आपण काय करणार ? "

" कांहींतरी केलं पाहिजे नाहीं ? "

" मला नाहीं वाटत, आपणाला कांहीं केलं पाहिजे तिच्याबद्दल. "

" शोभाबाई, तुम्हांला तिच्याबद्दल हेवा तर नाहीं ना वाटत ! "

" मला अन् अचलाबद्दल हेवा ! अन् तो कशाला वाटेल ? अन् हे तुम्ही विचारतांच काय पण ? "

" तुमची तिला सहानुभूती मिळेल असं मला वाटलं होतं. आपल्या स्त्रीदास्यविमोचनाच्या कार्यक्षेत्रांत नवरा मेलेल्या, नवऱ्यानें टाकून दिलेल्या, नवऱ्यांनी गांजलेल्या, कुमारिका, वृद्धा सगळ्या जातीच्या स्त्रिया येतात नाहीं ? अन् अचलाहि त्यांत येऊ शकेल नाहीं ? मला वाटलं, न जाणो तुम्हाला तिचा हेवा वाटला असेल ? "

" हेवा कशाबद्दल वाटेल ? अन् त्यांतून मला तर कशाला हेवा वाटेल ? "

" श्रीमंत माणसाला जास्त श्रीमंत माणसाचा हेवा वाटतो ना! तसाच दुःखी माणसाला अधिक दुःखी माणसाबद्दल हेवा वाटणें तत्वतः शक्य आहे; नाहीं का ?"

" असं होय ? मग तर तिलाच माझा हेवा वाटला पाहिजे. मला वाटलं, मला तिच्या रूपाबद्दल हेवा वाटतो असं तुमच्या मनांत आलं कीं काय ?"

" कधीं कुणाच्या रूपाबद्दल वाटाघाट करीतांना मला तुम्ही पाह्यलं आहेत का ? मी भगिनींच्या रूपांची चर्चा कधींच करीत नाहीं."

" वाटाघाट नाहीं केली म्हणून काय झालं ? अचला दिसायला चांगली आहे, वादच नाहीं. अन् तिच्याबद्दल ज्याला त्याला सहानुभूती आपोआप वाटणारच ! आणखीन् तिच्या नवऱ्याचं तरी हेंच गाऱ्हाणं असेल, कीं तिऱ्हाईत पुरुष भारीच हिच्याबदल सहानुभूती दाखवितात, अन् तीहि पण परपुरुषांच्या सहानुभूतीची भारीच परतफेड करते."

" असली थट्टा करणं म्हणजे तिला अन्याय करणं आहे. शोभाताई, तुम्हाला मी एक काम सांगणार होतो, अन् त्याचाच विचार करीत होतों."

" काय ! सांगा ना !"

" नको. तुमची सहानुभूती नाहीं, मनापासून तुमच्याच्यानं तें होणार नाहीं. दुसऱ्याला कुणाला तरी सांगेन."

" मला सांगा. मी काम करते कां नाहीं तें पाहा. चेष्टेनं बोलले म्हणजे कांहीं मी निष्ठुर नाहीं. अचलेबद्दलचंच काम आहे ना ! तिच्या राहण्याची व्यवस्था करायची आहे ना !"

" होय. माझं म्हणून तेवढं काम कराल का ! कांहीं दिवस तिला तुमच्या इथें राहूं द्या. पुढें तिची राहण्याची कुठेंतरी तजवीज लाऊं. ती तुम्ही येण्यापूर्वीच येथें आली होती. तिला मी बोर्डींग सोडून जाण्यास सांगितलं तेव्हां ती येथून रडतच गेली. तेव्हां तिची समजूत घाला. ती आपल्या खोलींत गेली असेल."

" बरं, मी पाहतें. मी तिला माझ्याकडे आज घेऊन जाते राह्यला. दुसरी व्यवस्था होईतोंपर राहील."

" तेंच बघा. मांझी काळजी दूर होईल. घरचं झालं थोडं अन् व्याह्यांनीं धाडलं घोडं ! घरच्या काळज्यांनीं वैतागून सार्वजनिक काम करायला निघालों तों येथेंहि कुणाच्या ना कुणाच्या काळज्या येऊन पडतातच. पण त्यांतल्या त्यांत तुमच्यासारख्यांची मदत हक्कानं मागतां येते हा मोठाच आधार असतो. "

शोभाच्या चेहऱ्यावर एकदम आनंदाची टवटवी दिसूं लागली. आतां-पर्यंत शोभाचा चेहरा बराच हिरमुसला दिसत होता. 'अचलेबद्दल हेवा वाटतो का तुम्हाला ' असें जयपालानें विचारलें त्यासरशीं तिच्या डोक्यांत त्वेषाच्या विचारांनीं अगदीं थैमान चालविलें होतें. तिच्या चेहऱ्यावर राग, मत्सर, पराजय ह्यांच्या आलटून पालटून छटा उमटत असतांना तिचा चेहरा मधून लालबुंद तर मधून निस्तेज दिसत होता. पण 'तुमच्यासारख्यांची मदत हक्कानं मागतां येते ' हे जयपालाचे शब्द कानीं पडतांच, शोभाच्या शंका दूर झाल्या, तिच्या मनाला हुरुप आला, मनांतला आनंद चेहऱ्यावर टवटवी उत्पन्न करून गालांच्या खळ्यांतून हांसू सांडू लागला. शोभानें उजवा खांदा उडवून आतांपर्यंत अडकवून ठेवलेला पदर मुदामच खाली सोडला, अर्धा पाठीवर तो डाव्या हातानें ओढून घेतला, व उजव्या हातानें अंबाड्याला चाचपून पाहिले. जयपालाची दृष्टी टेबलाकडेच रोखलेली होती, नाहींतर त्याच्या बोलण्यानें शोभाच्या चेहऱ्या वागणुकींत होणाऱ्या स्थित्यंतरांनीं तो खात्रीनें आश्चर्यचकित झाला असता, कदाचित भांबावूनहि गेला असता.

" खरं ना ! " शोभानें ओंठ चांवला, जयपालनें शोभाकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें, शोभा गोंधळली अन् कांहीं तरी बोलायचें म्हणून म्हणाली. " अशांच्या हकीगती वर्तमानपत्रांतून चव्हाट्यावर मांडल्या पाहिजेत. त्यांची ढोंगं बाहेर पाडली पाहिजेत. "

" तुमचे किरात आहेत ना त्यांना सांगा. महिला मासिकांत ह्याबद्दल लेख लिहा. खरंच ! तुम्ही आतांशा लेख लिहायला लागला आहांत नाहीं कां ! मी विसरलों होतो. मग तुम्हीच लिहा कीं ? अचलेची माहिती विचारून घ्या अन् द्या छापून. "

" छेः ! माझं लिहिणं म्हणजे शिवण कामा पुरतं. तुम्हीच जयपाल लिहा ना ! अचलेची अनायासे तुम्हाला खडान्‌खडा माहितीहि आहे ? "

" कुणाला ? मला ! अचलेची जेवढी तुम्हाला माहिती आहे, तेवढी-सुद्धां मला नसेल. मला लिहितां येत असतं तर मोठमोठाले लेख लिहून मी केव्हांच कर्तासमाजसुधारक म्हणून मिरवलों असतो. हिथं ऑनररी सेक्रेटरी म्हणून कशाला काम करीत बसलों असतो ? बाकी मला माझं कामच पसंत आहे. बरं आहे एका अर्थी मला लिहितां, बोलतां येत नाहीं तें. खरं काम माझ्या हातून झालं नसतं. आपल्या देशाला वाचाळ वावदूकांची आतां जरूरी राहिली नाहीं. गुपचूप पण आस्थेनं काम करणाऱ्या सार्वजनिक सेवकांची जरूरी जास्त आहे. "

" पाहतं. किरातांना सांगून सगळी हकीगत छापूं आपण. "

---

# २

" अचलाबाई ! मला तुम्ही मोठ्या बहिणीप्रमाणं समजा ! अन् जी काय तुमची हकीगत असेल ती खडान्खडा सांगा. " शोभा म्हणाली.

" माझी मेलीची हकीगत ती काय असणार ! तुम्ही ती जाणतच आहांत. अन् खरं सांगू ! माझी हकीगत इतकी टाकाऊ आहे कीं, ती सांगतांनाहि मला लाज वाटते. आपली एक टाकून दिलेली मी आहे, असं समजून तुम्हाला दया येऊन जेवढी मदत करतां येईल तेवढी तुम्ही मदत करतां आहां. तुम्हाला नाहीं म्हणायचंसुद्धां जिवावर येतं. पण काय कसं ? " अचलेचा कंठ दाटून आला.

" अचलाबाई. असं वाईट वाटून काय घेतां ? अहो अशा हकीगती घरोघरीं घडत असतातच. तुमच्या आपल्या एवढ्या थराला आल्या, दुसऱ्यांच्या आपापसांत दाबल्या जातात, एवढंच. तुमची हकीगत वर्तमानपत्रांतून छापून आली पाहिजे. अलीकडे नवऱ्यांनीं बायकांना छळण्याचं भारीच चालविलं आहे. खुशाल पहिल्या बायकोला टाकून देऊन दुसरीं, तिसरीं लग्नं करतात. ह्याला कांहींतरी आळा पडलाच पाहिजे. "

" पण माझी हकीगत छापण्यासारखी ती काय आहे ! मला टाकून दिली, हाल केले, दुसरं लग्न केलं, एवढीच हकीगत. अशा तर हकीगती पुष्कळांच्या असणार ! अन् तुम्हाला सांगूं ? "

" काय ? "

" तुम्ही समाजसेवा करण्याच्या हेतूनं हकीगती छापायला जाल, आणि मला त्यांच्यापासून विनाकारण जास्त त्रास होईल. मी तुमच्या शाळेंत आहे ही बातमी इकडे नव्हती, माझं शिक्षण चार महिने बिनबोभाट झालं नव्हतं का! पण मी येथे राहिल्याचं समजतांच माझी छळणूक सुरू झाली अन् परिणामी मला वसतिगृहांतून निघावं लागलं."

" पण कुणीतरी समाजांत दाखला घालून दिला पाहिजे. दरेकजण अशी गप्प बसूं म्हणते, म्हणूनच नवऱ्यांना फावतं."

" आम्ही नवऱ्यांचे अनन्वीत छळ सोसतों, समाज तटस्थ राहून ते छळ पाहत राहतो. ह्याच्यापेक्षां समाजाला आपण जास्त काय सांगणार! निजलेल्याला जागं कराल, पण डोळे उघडून अन्यायाला उत्तेजन देणाऱ्या समाजाला कसें जागे करणार! कसायाला गाय विकली म्हणजे तो तिचे वाटेल ते हालाल करीत असला तरी आपल्याला बोलतां येत नाहीं. नवऱ्यानें बायकोचे कितीहि हाल केले तरी कुणाला कांहीं बोलतां येत नाहीं, मध्यें पडावसं वाटतहि नाहीं. समाज धाऊन येईल, हा नुसता भ्रम आहे. एवढा जर समाज जिवंत असता तर बायकांचे हाल करायला नवरे धजलेच नसते. एवढंच खरं, कीं जिचं तिनंच भोगायचं असतं. तुम्हालाहि अनुभव असेलच मी म्हणते त्याचा."

" अनुभव म्हणजे काय पुरा अनुभव आहे. फुकाची शब्दानींसुद्धां सहानुभूती मिळत नाहीं बायकांना! पूर्वीचे जिवश्चकंठश्च स्नेही पण बाईवर प्रसंग येतांच, लांब सरकतात आणि तमाशा पहात उभे राहतात. पण म्हणून बायकांनीं स्वस्थ बसून कसं चालेल?"

" कित्येक वेळां स्वस्थ बसून अनिष्ट काळ तसाच जाऊं द्यावा लागतो. मला मदत करायची तर तुम्ही मला कांहीं काम मिळवून द्या. पण तें घरांतल्या घरांत करण्यासारखं असावं मात्र. नाहीं तर दुसऱ्यांच्या इथें कुठे कामाला जाऊं लागले तर इकडे खपत नाहीं. माझी नोकरीचाकरी टिकू देत नाहींत."

" हा न्याय बराच आहे कीं! आपण स्वतः बायकोला खायला घालायचं नाहीं; अन् ती दोन धंदे करून पोट भरीन म्हणाली तर तिला तसंहि करूं द्यावयाचं नाहीं. मग तिनं काय उपाशीं मरायचं कां?"

" अन् ती मरत नाहीं हाच तर तिचा मोठा गुन्हा ! नवऱ्यांचं म्हणणं बरोबर आहे म्हणा. टाकलेल्या बायकांचं कामच काय उरलं असतं जगांत ? अन् तिनं जगावं तरी कशाला ! पण करायचं काय ? एक जिवाचं बरं वाईट करण्याचं धारिष्ट नसलं ना माणसाला, कीं त्याला जिवंत मृत्यू सहन करावा लागतो."

" बघा बाई ! मी तुम्हाला मदत करीन. पण तुम्हीसुद्धां माझ्याशीं मनमोकळेपणानं वागलात, तर मला समजेल तुम्हाला काय काय आणि कोणकोणती मदत पाहिजे तें ! जयपाल मला म्हणाले होते कीं अचलाची सगळी हकीगत विचारा. म्हणून तरी मी विचारल्यें. नाहींतर तुम्हाला वाटेल ही बाई मला कोण विचारणार ? नाहीं आपलं सांगते."

" नाहीं मी कशाला तसं म्हणूं ? जयपालांना सांगा कीं कांहीं विशेष अशी हकीगत नाहीं. माझ्यासारख्या चारचौघींची असते, तशीच हकीगत माझी आहे."

अचलेची कांहींच हकीगत समजली नाहीं म्हणून शोभा मनांतून अस्वस्थ झाली. जयपालाचें नांव घेतल्यावर तरी अचला कांहीं जास्त हकीगत सांगेल असें तिला वाटलें होतें, परंतु तोहि तिचा कयास चुकला त्यामुळें तिचा हिरमोड झाला. थोडीबहुत ती अचलेवर चिडलीहि खरी. परंतु जयपालांनींच तिची व्यवस्था करण्यास तिला सांगितलें असल्यानें तिचा इलाज चालेना. ती बाहेर निघून गेली.

ती घरांतून बाहेर गेली आणि लगेच जयपाल आला. अचलेनें त्याला 'या बसा' म्हणून म्हटलें नाहीं, तरी जयपाल आपणहूनच बसला आणि म्हणाला.

" अचलाबाई ! व्यवस्था ठीक आहे ना ! मी दुसरी कांहीं तरी सोय पाहतों आहे. परंतु नीटशीं सोय लागत नाहीं."

" हिथे काय वाईट आहे ? बरी आहे व्यवस्था हिथे. शोभाबाई प्रेमळपणानं वागतात. घरच्यासारखं वागवितात."

" नाहीं ! त्यांच्याकडे चार माणसं येणार जाणार ! दरेकांनीं विचारावं ह्या बाई कोण ! अन् प्रत्येक वेळीं सांगायला लागावा इतिहास म्हणजे मग तुम्हाला चोरट्यासारखं व्हायचं !"

" ते तर खरंच ! आज मला त्या विचारीत होत्या कीं, तुमची हकीगत काय आहे ती सगळी सांगा. मी म्हटलं माझी हकीगत इतर टाकलेल्या दहाजणीं सारखीच आहे. त्या म्हणत होत्या आपण हकीगत छापूं, तर मी सांगितलं कीं, माझं शिकणं व्हावं, पोटापाण्याची तरतूद लागावी असं जर तुम्हाला वाटत असेल, तर मला आपली अज्ञातवासांतच राहूं द्या. तुम्हां सगळयांना इकडचा स्वभाव किती खुनशी आहे तें माहित नाहीं अजून ! सूड म्हणजे पुरा सूड उगवतात. "

" असं ना ! मी तुम्हांला हकीगत विचारतो आहे असं नका समजूं. तुमच्या राहण्याची सोय लागावी म्हणून मी विचारतों. तुमच्या माहेरची माणसं कुणीं नाहींत का ? लांबची नात्यागोत्याची कुणीं ? "

" माहेरचीं माणसं आहेत, भाऊ आहेत, चुलते आहेत, मावशा आहेत. ह्यांनीं मला डागली भाजली, कोंडून ठेवली तेव्हां आईच्यानं पाहवेना म्हणून तिनं सर्वांची मदत मागितली. पण भाऊभावजयांना चिंता पडली कीं ही येऊन राहील आपल्या इथे ! माझा कैवार घेण्याऐवजी सर्व मंडळी त्यांचाच कैवार घेऊं लागली. तश्शी मी सगळं श्रम सोशीत राहिलें. पुढं दुसरं लग्न करण्याचं त्यांच्या मनांत आलं. मला त्यांनीं वेडी ठरविली. तेव्हां आई कुठं मुलींच्या इथल्यांना सांगायला गेली, कीं माझी मुलगी वेडी नाहीं आहे अन् तिचा ह्यांनीं छळ मांडला आहे. झालं ! माझी मारझोड दुप्पट झाली. अन पुढे तर मवाली गड्यांकडून जवळ उभं राहून मला मारवीत. त्यांना वाटे मी आईला सांगितलं, कीं लग्न मोडण्याचा ती आग्रह करील. नवीन सवत घरांत आली. तिनं सांगितलं, कीं वेडी असो कीं शहाणी असो, घरांत सवत म्हणून असता कामा नये. तेव्हां माझी कैदेंतून सुटका झाली—म्हणजे मला घरांतून घालवून दिली. मी गांवांतल्या गांवांत आईकडे आले. पण भावांनीं मला जायला सांगितलं. मी बाहेर पडले. कशी झाली तरी आईच ती ! तीहि माझ्या मागोमाग बाहेर पडली. आम्ही एका ओळखीच्या कुटुंबांत राहूं लागलों. आई दुसऱ्याकडे सैंपाकाला जाऊं लागली. तेव्हां भाऊ लाजले, रागावले, आईला पुष्कळ बोलले. शेवटी आईला दहा रुपये दरमहा देत. मी दळण दळी, आणखीन अशीं चार वर्षें काढलीं. पुढें आई मेली, माझा आधारच नाहींसा झाला.

म्हणून मी तुमच्या संस्थेंत आल्यें. त्यानंतरचं तुम्ही जाणतांच आहां. असा इतिहास आहे. काय सांगायचा! गांवभरला नात्याचा अन् एक नाहीं कामाचा!" अचलेचा कंठ दाटून आला, तिच्या डोळयांत अश्रू उभे राहिले. "असी ही कर्मकहाणी आहे! कुणाला सांगावं तर म्हणतात हिचाच दोष असेल; उगीच्च हिला का नवऱ्यानं टाकली? नाहीं. माझ्या हातून जर कुठला गुन्हा झाला असताना! तर त्या गुन्ह्यांबद्दल शिक्षा म्हणून मी शरीराचं बरंवाईट तेंव्हांच केलं असतं. पण जीव देण्याचा धीर होत नाहीं. मग मला मूर्ख म्हणा कीं अडाणी म्हणा. देहाचं ममत्व वाटतं म्हणा, कीं धीर होत नाहीं म्हणा, छळानं वैतागून गेले तरी असं वाटत नाहीं कीं जिवाचं आपण बरंवाईट करावं! हा तरी एक वेडा हट्टच आहे म्हणतात."

"याला मी वेडा हट्ट म्हणणार नाहीं. दुसऱ्याला आपण कुठल्याहि कारणांनीं आवडेनासे झाल्यें, कीं आपल्या देहाची किंमतच नाहींशीं झाली असं मानणं म्हणजे आपल्या मानवी अस्तित्वाचा अपमान करणं होतं. देहाची सार्थकता स्वतंत्र आहे, परोपकारांत आहे, दुसऱ्यांचा उद्धार करण्यांत आहे."

"कसला परोपकार अन् कसला दुसऱ्याचा उद्धार? जिला नुसती दुसऱ्यांची सहानुभूतीहि मिळवतां येत नाहीं तिची देहाची सार्थकता–किंमत संपली. एकाद्याला स्वतंत्र आस्तित्व असेल तर त्याच्या त्या गोष्टी असतात. बायकांना नवऱ्याव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्वच कुठं असतं? पतिदेवपूजा हेंच तिच्या जन्माचं सार्थक! अन् पतिदेव तिची पूजा घेईनासे झाले कीं ती निर्माल्याहून निर्माल्य होऊन दुसऱ्यांच्या पायदळीं तुडविली जाते."

"हीच वस्तुस्थिती बदलली पाहिजे. आपण विसाव्या शतकांत आहोंत. दृष्टीकोन बदलला आहे लोकांचा."

"वर्तमानपत्रीं जगांत बदलला असेल, कादंबऱ्या नाटकांतून बदलला असेल; पण वस्तुस्थिती खरी पाहली तर समाज पांचशें वर्षांपूर्वी जस्सा आमच्याबद्दल निष्ठुर होता तस्सा न् तस्सा आजहि आहे."

"असं कसं म्हणतां?"

"अगदीं खरं ते बोलतें. एकीला टाकून देऊन दुसरीशीं लग्न करणारा पुरुष चांगला साळसूदपणानं समाजांत वावरतो. बाबारे, हें तुझ्या हातून वाईट

कृत्य झालं असं सुद्धां कुणी त्याला दर्शवीत नाहीं. आणि त्यानं टाकून दिलेल्या बायकोवरच उलट आग पाखडायची, तिला नुसतं जगणंहि कठीण करायचं ही तर समाजाची रीत ! बरं त्यांत दोष कोणाचा आहे ह्याची नुसती चौकशी सुद्धां करायची नाहीं. अन् खुशाल नाहीं नाहीं ते आरोप अशा बाईवर लादायचे. तुम्हीच सांगा, समाजाचा दृष्टीकोन बदलला आहे का ! ”

“ समाजांतलीं सगळींच माणसं कांहीं अशीं नसतात. ? ”

“ मी कुठं म्हणतें आहे कीं, सगळीच माणसं इथून तिथून वाईट असतात. पण चांगल्या माणसांनाहि, आम्हांसारख्यांना मदत करण्याबद्दल, इतका कांहीं त्रास सोसावा लागतो कीं, नको जीव होऊन जातो. वाटतं, कुठून आपण ह्यांची मदत घेतली अन् त्यांना संकटांत टाकलं ! आमचं दुर्दैवच इतकं खडतर असतं, कीं आम्ही ज्यांच्या आश्रयाला म्हणून उभ्या राहूं त्यांच्याच कपाळावर सूडाची वीज पडायची. म्हणून तुम्हांला मी सांगतें, कीं तुम्हीसुद्धां लांबून लांबून अन् सहजासहजीं जेवढं म्हणून माझ्यासाठीं करूं शकाल तेवढंच करा. नाहींतर विनाकारण त्रास होईल तुम्हाला. माझी मी हालअपेष्टा सोसायला तयार आहे. ”

“ अं : ! मला काय त्रास पोंचणार ! पैशाटक्क्यानं, अब्रूनं, निश्चयानं मी इतका खंबीर आहे, कीं माझ्यावर सूड कोणी घेऊं म्हणेल तर त्याचाच कपाळमोक्ष होईल. विलास माझ्या केसालासुद्धां धक्का लावूं शकणार नाहीं. ”

“ भ्रम आहे ! त्यांच्या भयंकरपणाची कल्पना नाहीं तुम्हाला ! माझी कुठे एक चिठ्ठी आईला पोंचविली ह्या अपराधाबद्दल त्यांनीं मोलकरणीच्या पोरीला माझ्याबरोबर डागली. आपणच घेऊन तिला हॉस्पिटलमधें गेले. स्टोव्हनी भाजल्याचं सांगून सगळीकडे गुपचुप केलं. आईनं मला आसरा दिला तर काबाडकष्टानं तिचा मृत्यू आला. अशी गत आहे माझ्या नशिबाची. ”

“ पण सगळ्यानीच असं भ्यायलं तर चालणार कसं ! कुणीतरी धाऊन गेलं पाहिजेच ना ! माझ्यावर कुठल्याहि जबाबदाऱ्या नाहींत. तेव्हां माझ्या-सारख्यांनी ह्यांत पडायला कांहीं हरकत नाहीं. ”

“ बघा, नीट विचार करून. माझ्या एकटीच्यासाठीं वनिता–विश्रामचं काम अडकून राहूं नये. आज तुम्ही म्हणजे त्या संस्थेचे आधार आहांत अन्

माझ्यामुळें जर संस्थेवर कुठलीहि आपत्ती येणार असेल, तर मी दुसऱ्या कुठल्यातरी शाळेंत जाईन. कुठून तरी पोटाची विद्या मला शिकायची आहे. विधवा असतें तर दुसऱ्याच्या हिर्थे सैंपाक पाणी केलं असतं, पोट भरलं असतं. पण असल्या मंडळींशीं गांठ पडली आहे कीं मला दुसऱ्याच्या हिर्थे सुखासुखी मोलमजूरीहि करूं देणार नाहींत."

"पाहूं आपण पुढें काय काय होतं तें! बरं मी जातों." असें म्हणून जयपाल जागेवरून उठला आणि दरवाज्यापाशीं येतो तो शोभाबाई परत येतांना भेटली.

"कां! निघालांत? बसा कीं, मला कांहीं आतां काम नाहीं आहे." शोभा म्हणाली—

"नाहीं–जातों आतां! बराच वेळ झाला आल्याला मला! पुनः एकादं दिवशीं येईन."

"अस्सं?" शोभाबाईनें जयपाल आणि अचला ह्यांच्याकडे एकदम अशा कांहीं चमत्कारिक नजरेनें पाहिलें, कीं अचलेचा चेहरा गोरामोरा झाला, जयपालास खुलासा करणें जरूर वाटलें.

"अचलाबाईची व्यवस्था नीट लागली कीं नाहीं ते विचारायला आलों होतो. बसलों होतों बोलत."

"बरं, ह्या निमित्तानं तरी तुम्ही आलांत? मी आज आठन् आठ महिने 'या या' म्हणून बोलावून कंटाळले, तर आज तुम्हाला वेळ सांपडला." शोभानें आपली बोलण्याची ढब एकदम बदलली. उसने हांसून आणि किंचित् मुरडत ती म्हणाली. "जयपाल! तुम्ही कधीं नव्हतां ते आलांत, तर चहा घेतल्याशिवाय मी थोडीच जाऊं देणार आहे! अन् अचलाबाई तीन कप चहा टाकतां कां!" असें म्हणून तिनें हातांतली मनी बॅग आणि कागद टेबलावर ठेवले आणि ती आंतल्या खोलींत गेली.

जयपालचा नाइलाजच झाला. टेबलावर शोभानें ठेवलेले कागद तो चाळीत होता, इतक्यांत शोभा आली हें पाहून तो म्हणाला.

"ही आपल्या लेखाचीं पानं आहेत वाटतं! बरींच पानं झालीं कीं! एकादं पुस्तक तयार होईल."

" तेंच ना! किरात मागं लागले आहेत कीं तुम्ही शिवणकामाचं एक पुस्तक छापा. चांगले पैसे मिळतील. म्हणूनच किरातांच्याकडेच गेले होतें, पण ते भेटले नाहींत. कळलं कीं ते कुणाच्याशा लग्नाला लोणावळयाला गेले आहेत. "

" असं! अहो तर मग मी सांगतो ते साहित्य प्रमूखांच्या नव्या धर्तीच्या लग्नाला गेले असतील खास. "

" साहित्य--प्रमूखांच्या नव्या धर्तीच्या लग्नाला म्हणजे काय ? मी समजले नाहीं! "

" पहिल्या बायकोला टाकून देऊन दुसरा अभिनंदनीय विवाह करण्याची शिष्टांनीं नवीन रूढी मांडली आहे ना! त्याला नवीन धर्तीचं लग्न मी म्हणतों. "

" पण साहित्यप्रमूखांनीं म्हणे पुनर्विवाह केला आहे ? "

" अहो मी तरी तेंच म्हणतों आहे! कीं साहित्यप्रमूखांचं पुनर्लग्न आहे. त्यांतला खास अभिनंदनीय भाग म्हणजे त्यांची पहिली बायको जिवंत आहे नवऱ्याच्या दुसऱ्या लग्नाचा सोहळा पाह्यला. "

" तसं नव्हे हो! त्यांनीं विधवेशीं पुनर्विवाह केला आहे. हें चांगलं केलं नाहीं कां ?

" विधवेशीं पुर्नलग्न केलं म्हणून तुम्ही त्याला अभिनंदनीय विवाह म्हणा! पहिल्या बायकोच्या हयातींत दुसरीबरोबर लग्न केलं म्हणून आम्ही त्याला नवीन धर्तीचा अभिनंदनीय विवाह म्हणतो. तुमच्या काय किंवा आमच्या काय, दोस्तांच्या दृष्टींनीं तो अभिनंदनीयच विवाह होय. "

" पण खुद्द किरात असल्या लग्नांच्या विरुद्ध आहेत. "

" चुकतांहा तुम्ही! त्यांच्या कंपूबाहेरच्या कुणी माणसानं असा विवाह केला तर त्याचे वाभाडे काढतील. तुम्हीच बघाल, ह्या लग्नाबद्दल साहित्यप्रमूखांचं अभिनंदन ते करतात कीं नाहीं तें. "

" कसं झालं तरी ते एका मासिकाचे संपादक आहेत. अशी धरसोड त्यांना चालायची नाहीं करून. "

" अशी धरसोड एकट्या संपादकालाच शोभते. तुमच्या आमच्यासारख्या साधारण माणसांना ती पचायची नाहीं. संपादक म्हणजे पोटभरू माणसं.

जो चहाचिवडा देईल, मोटारींतून फिरवून आणील त्याच्या स्तुतीचे नगारे वाजविणारे भाट म्हणजे संपादक ! त्यांना कसलीं आलीं आहेत मतं ? आणि मतांची चाड ?"

"खरंच ! अचलाबाईंची हकीगत महिला मासिकांत छापावी का ?"

"छेः ! कांहीं छापण्यासारखी नाहीं."

"तुम्हाला त्यांनीं हकीगत सांगितली वाटतं ?"

"सांगितली नाहीं, पण मला कळली. कांहीं छापूं नका."

"वा ! मी किरातांना सांगून सुद्धां आले होते कीं अचलेची हकीगत छापा. ते बरं म्हणाले. तेच समक्ष विचारायला येणार आहेत."

"त्यांना सांगा, जयपाल म्हणतात हकीगत छापूं नका."

इतक्यांत अचला आंतून चहाचे कप घेऊन आली. शोभाबाईंनें तिच्याकडे भेदक दृष्टीनें पाहिलें, आणि लगेच जयपालकडे पाहिलें. जयपाल आणि अचला मनांतून अस्वस्थ झालीं.

तिघां जणांनीं एकत्र बसून चहा घेतला. चहा पितांना कुणीं कुणाशीं कांहींच बोलले नाहीं. दुसऱ्यांच्या मनांत काय विचार आले असतील ह्याचाच प्रत्येकजण विचार करीत होतें.

चहा पितांच जयपाल निघून गेला.

"दुसरीकडे कुठं तुमची सोय लावणार होते जयपाल, ती लावली कां ?" शोभानें तुटकपणें अचलेला विचारलें.

"कांहीं नाहीं म्हणाले त्याबद्दल."

"मला वाटलं त्याबद्दलच बोलणीं बोलत बसलां असाल ?"

---

# ३

“ या किरात ! काय साहित्यप्रमूखांचं लग्न वगैरे पार पडलं ? अन् शोभा, येवढे किरात आले आहेत तर चहा आणवतां का ! ” जयपालानें किरातांचें स्वागत करतांना म्हटलें. तो उभा राहिला आणि किरात खुर्चीवर बसल्यावर तो बसला.

वनिता विश्रामच्या कचेरींत ह्यावेळीं तीं तिघेजण होतीं. आज रविवार होता, शाळा बंद होती. फिरायला घेऊन येते असें आदल्या दिवशीं शोभानें जयपालला सांगितलें होतें. जयपाल किरातची वाटच पहात बसला होता.

“ मी चहाचं सांगून ठेवलंच आहे. किरात बसा ना ! ” शोभा किरातच्या जवळच्या खुर्चीवर बसतां बसतां म्हणाली.

“ मला बसायला फुरसत नाहीं ! डॉ. मालिनीबाई वाट पहात असतील. त्यांना घेऊन राणीसाहेबांच्याकडे जायचं आहे. आज त्यांनीं भेटायला बोलावलं आहे. ” किरात म्हणाला.

जयपाल :—अहो ! नीट सांगा कीं आम्हाला राणीसाहेबांना भेटायला यायचं आहे, अशी तुम्ही त्यांना विनंति केली, त्यांनीं तुम्हाला आजची वेळ दिली, असं सरळ सांगाना ! नाहींतर कुणाला वाटेल कीं, राणीसाहेब जशा त्यांना भेटण्यासाठीं खोळंबल्या आहेत.

शोभा :—अन् किरात, तुम्ही काल काय कबूल केलं होतंत कीं विश्रमांतून आपण दोघांनीं माझ्याकडे जायचं ! राणीसाहेबांनीं संध्याकाळीं बोलावलं आहे ना ! मग त्याची धांदल आतांपासून कशाला ?

किरात :—आतां मला बिलकुल वेळ नाहीं! कुमारी शैला बी. ए. बी. टी. टी. डी. अन् त्यांच्या मैत्रिणी श्रीमती सुनंदा एम्. ए. बी. एस. एस. टी. सी. डी. ह्या आमच्या ऑफिसांत आत्तां येणार आहेत.

जयपाल :—मग तर तुमची फारच धांदल उडत असेल नाहीं ?

किरात :—स्त्रियांचं मासिक चालविण्याचं मी कुठून पत्करलं असं मला वाटूं लागलं आहे. एकसारख्या स्त्रिया भेटायला येतात, लेखांबद्दल वाटाघाट करतात, कांहीं कांहीं बाबतींत सल्ला विचारतात. कुणी लग्नाबद्दल तर कुणी...

जयपाल :—मग एकंदरींत तुमचं लांबणीवर पडलेलें काम जमून जाणार म्हणतां!

शोभा :—पुरे! बायकांनीं अन् त्यांतून शिकलेल्या बायकांनीं लाजाच सोडल्या आहेत अगदीं! तिऱ्हाईतालासुद्धां आपल्या खासगी हकीगती सांगत सुटतात.

जयपाल :—शिकलेल्या बायकांच्या खासगी हकीगतीसुद्धां सार्वजनिक महत्त्वाच्या झालेल्या असतात, सर्वांना माहित असतात.

किरात :—स्त्रियांचीं दुःखं चव्हाट्यावर मांडलीच पाहिजेत कुणीतरी, नाहीं का!

जयपाल :—होय. ज्या स्त्रियांच्या यजमानांची अन् आपली ओळख-देख नसेल अशांचीं दुःखं चव्हाट्यावर जरूर मांडली पाहिजेत चव्हाट्यावर.

शोभा :—आणि ओळखीच्या नवऱ्यांच्या बायकांचीं दुःखं!

जयपाल :—त्या बायकांचीं दुखं दुःखंच नसतात! उलट अशा ओळ-खीच्या माणसांचीं पत्नीविषयक दुःखंच पुढं मांडायचीं असतात.

किरात :—असला पक्षपात संपादकाला करून चालणार नाहीं.

जयपाल :—लांब कशाला! साहित्यप्रमुखांच्या लग्नाला तुमचे साहित्यिक बरेच हाजर होते म्हणे आणि अभिनंदनपर भाषणं झालीं म्हणतात, खरं ना!

शोभा :—पुरे! ह्या साहित्यिकांना घसा मोकळा करायला कांहीं तरी निमित्त लागत असतं. कुठला तरी समारंभ काढतील, नाहीं तर चार मंडळी कुठें जमली म्हणजे जाहीर सभा समजून हट्टानं व्याख्यान देत राहतील. त्यांचीं बोलणीं मनापासून कां असतात!

जयपाल :—आजच मोठमोठ्यांच्या सहीनिशी साहित्यप्रमूखांच्या लग्नाचं अभिनंदन करणारं प्रशस्तिपत्रक प्रसिद्ध झालं आहे. किरात तुमचीहि पण त्यावर सही आहेच. अभिनंदन केलंत ठीक केलंत. लोकाविरुद्ध आपण वागलों आहोंत असं साहित्यप्रमूखांना वाटलं होतं, त्यांना धीर दिलात बरं केलंत. पण त्यांच्या पहिल्या बायकोबद्दल जो मजकूर लिहिलात तो अन्यायाचा आहे.

किरात :—तो कसा ?

जयपाल :—त्या पत्रकांत लिहिलं आहे कीं पहिली पत्नी·आज बरींच वर्षं वेडी आहे ! तिच्यापासून प्रमूखांना कधींच सुख लागलं नव्हतं, त्यांच्या प्रतिभेची कुचंबणा झाली होती.

किरात :—गोष्ट खरी आहे.

जयपाल :—अहो, तिचा थोरला मुलगा इंटरच्या क्लासांत आहे, मुलगी मॅट्रिकच्या क्लासांत आहे. उणींपुरी पंचवीस वर्षं त्यांच्या लग्नाला झाली ना ! तुमच्या प्रमूखांनीं पंचवीस वर्षं कोंडमारा सहन केला हें तुम्ही सगळं खरं समजून चालतां ना ! ती वेडी आहे हें तुमचं लिहिणं धादांत खोटं आहे. गेल्या वर्षीं त्या बाई आमच्या शाळेंत शिकायला येत होत्या. चांगल्या हुशार आहेत. नाहीं का शोभाबाई !

शोभा :—पण साहित्यप्रमूखांच्या मानानं त्या फारच कमी शिकलेल्या.

जयपाल :—त्यांना लेख लिहितां येत नाहींत म्हणून त्या वेड्या ठरल्या ! आणखीन् त्यासुद्धां ह्या नवीन बाईची जानपछान झाल्यानंतर. त्यापूर्वीं हेच प्रमुख पहिल्या बायकोला सभा संमेलनांतून बरोबर घेऊन अभिमानानं वावरत होते, तें मी डोळयांनीं पाहलं आहे.

किरात :—प्रमुखांची कुचंबणा होत होती ह्यांत शंका नाहीं. त्यांच्या बुद्धीशीं धडाडीनं समरस होईल अशी पत्नी त्यांना लाभली नाहीं म्हणून त्यांच्या प्रतिभेचं मातेरं झालं.

जयपाल :—आणि असला तऱ्हेवाईक दरिद्रीनारायण तिच्या वांट्याला आला म्हणून तिची काय कमी कुचंबणा झाली असेल होय ! मी सांगतो, ही दुसरी बाई त्यांना भेटली तरी पहिली बायको त्यांना नकोशी झाली.

शोभा :—पुरुषांची रीतच असते नाहीं तरी, तशी ! दुसरी कुणी सुरेख बाई मिळाली कीं पहिलीला विसरतात.

जयपाल :—मी कुठे नाहीं म्हणतो आहे. पण तसं खुश्शाल लिहा. एकमेकांस नकोशा झालेल्या नवरा बायकांनीं एकत्र रहावं ह्या मताचा मी नाहीं. त्यांनीं आपली सोडचिठ्ठी देऊन मोकळं व्हावं. पण असला हा सांवळा-गोंधळ कशाला ! आणि ह्याला किरात अभिनंदनीय विवाह म्हणतील.

किरात :—अलबत् !

जयपाल :—अनेक बायका करण्याची मुभा हिन्दुकायद्यानं पुरुषांना ठेवली आहे. जुन्या कालापासून पुरुष एकीच्या हयातींत दुसरीशीं लग्न करीत आले आहेत. त्यांचं मात्र अभिनंदन कुणी करीत नाहीं. त्यांना तुम्ही रानटी म्हणणार ! कां तर स्वतःच्या दुष्कृत्याचा बचाव करण्यासाटीं मोठेमोठे शब्द त्यांना सांपडत नाहींत. शिकलेल्यांना शब्द सांपडतात, स्तुतिपाठक सांपडतात, त्यांचे द्वितीय विवाह अभिनंदनीय ठरतात.

शोभा :—अहो पण ! प्रमूखानीं लग्न एका विधवेबरोबर केलं आहे. पुनर्विवाह हा अभिनंदनीय नाहींच कां !

किरात :—होय तेंही खरंच.

जयपाल :—विधवांच्या पुनर्विवाहाच्या चळवळीचा हेतू नांदत्या संसारांत फूट पाडायचा, संसारी पुरुषांना संसारांतून उठवायचा कधींच नव्हता. विधवांचीं लग्नं व्हावींत, पण सुवासिनींच्या अन्नांत त्यांनीं माती कालवावी असं म्हणतां येईल कां ?

शोभा :—पण विधवांनीं तरी काय करायचं ! ( जयपालकडे पाहून ) विधुर नवरे हयात असलेल्या स्त्रियांचा आणि अविवाहित पुरुष ( किरातकडे पाहून ) कुमारिकांचा अभिलाष धरतात तर विधवांनीं तरी कुणाशीं लग्नं लावावयाचीं !

किरात :—विधूरांनीं विधवांशीं लग्नं करावींत.

शोभा :—असा कायदाच मुळीं झाला पाहिजे कीं, विधूरांनीं विधवांशीं लग्न केलींच पाहिजेत.

जयपाल :—आणि कुमारांनीं कुमारिकांशीं, असंच ना !

शोभा :—नाहीं कुमारांनीहि पहिल्यान्दा विधवांशीं.

जयपाल :—आणखीन नंतर दुसरं लग्न कुमारिकांशीं लावावं असा कायदा पाहिजे म्हणता ! अभिनंदनीय विवाहांची झोड उठेल न् काय ! मजा होईल !

शोभा :—तसं नव्हे. पहिलांदा विधवांशीं लग्नं लावावींत, अन् विधवा मिळाल्या नाहींतच तर मग त्यांनीं कुमारिकांशीं लग्न करावींत. असा कायदा केल्याशिवाय विधवांची लग्नं कध्धीं होणार नाहींत.

जयपाल :—कुणीकुणाशीं लग्न करावीत याबद्दल कायदे होऊं लागले तर तोहि एक प्रकारचा जुलूमच होईल.

किरात :—ज्यांनीं त्यांनीं आपल्या पसंतीप्रमाणें शिकार साधली पाहिजे. विधवांना कुणी नको म्हटलं आहे ! त्यांनींही शिकार गाठावी कीं !

शोभा :—शिकलेल्या अन् कमावत्या घोडकुमारिका मिळत असतांना मुद्दाम बिनशिकलेल्या विधवांशीं लग्न करायला कोण तयार होईल !

जयपाल :—मग तर मुलींची शाळाच बंद केली पाहिजे. शिकतात मुली म्हणून पुष्कळ वयं होईतोंवर वाढतात, कमावूं शकतात, म्हणून लग्नाशिवायहि राहतात.

शोभा :—चालेल ! नाहीं तरी शिकून शिकून तरी काय दिवे लावायचे असतात !

किरात :—असं बघा. विधवांनीं तरी येवढं घायकुतीवर येण्याचं काहीं कारण आहे का ! बरं का शोभाबाई मी आपलं सर्वसाधारण बोललो ऑं. ! नाहींतर अंगावर ओढून घ्याल अन् रागवाल माझ्यावर.

शोभा :—मी शिकलेली नसले तरी थट्टा कोणची तेवढं मला समजतं. अन् तुमच्या बोलण्याचा मीं कधीं तरी राग धरला आहे कां !

किरात :—नाहीं तशा तुम्ही चांगल्या आहांत. पण खरंच, बोलण्याच्या नादांत उशीर पुष्कळ झाला.

जयपाल :—अन् चहा आणण्याचंहि शोभाबाई विसरल्या.

शोभा :—काहीं विसरले नाहीं मी ! चहा घेऊन हा गडी आला बघा.

किरात :—मला ऑफिसांत गेलं पाहिजे, कुणी तरी विदूषी वाट पाहत बसल्या असतील.

जयपाल :—शोभाबाई, तुम्हीं ह्यांच्याकडे नेहमीं जाता नाहीं कां !

शोभा :—बरं मग ! मला काय कोणाची भीती आहे.

किरात :—धोका असला तर मलाच आहे. अहो ह्या माझ्याकडे येऊं लागल्यापासून भलत्याच बातम्या आमच्याबद्दल उठूं लागल्या आहेत.

जयपाल : —अभिनंदनीय विवाहाच्याच ना ! मग त्यांत तुम्हाला धोका कसला !

किरात :—हूं ! जावं त्याच्या वंशा, तेव्हां कळें.

शोभा : —ही काय हो असली ही थट्टा !

जयपाल :—माफ करा आं ! तुम्ही त्यांच्याकडे जाता ना, हें येवढ्यासाठींच विचारलं कीं, त्यांच्याकडे जातयेत असलात तर तुम्हीहि विदूषी झालातच. आहो त्यांच्याकडे ज्या जातात त्या विदूषीच असतात. न शिकलेल्या बायकाहि यांच्याकडे जाऊं येऊं लागल्या कीं विदूषी होतात.

चहाचा घोंट घेतां घेतां जयपाल म्हणाला. किरात खोखो हांसला, शोभा ' असं होय ! ' असें म्हणून गालांतल्या गालांत हांसू लागली. चहा होतांच किरात जाण्यास निघाला, त्यास शोभा म्हणाली

" बरं किरात, माझ्याकडे येतांना ! अचला माझ्याकडे आहेत, त्यांची हकीगत विचारून घ्या अन् चला. "

" मी एकाद वेळेस येईन. आतां नको. " किरात म्हणाला.

" मग नुसते बसायला तरी चला. आज मला सुट्टी आहे. थोडा वेळ बसूं मग जा ! वाटेवरच आहे घर माझं. शोभाबाईनें आर्जवानें म्हटलें.

" गप्पाच मारायच्या असतील तर जयपालांना घ्या कीं बरोबर ? " किरातानें उत्तर केलें.

"नको. माझ्या बोलावण्यानं ते येणार नाहींत. विचारा त्याना ! मी येवढ्या वेळा बोलावते तर ते कधीं तरी येतात कां ? ठरावीक माणसं लागतात त्यांना बोलायला. " शोभानें कुत्सीत नजरेनें जयपालाकडे पाहून म्हटलें.

" कां बरं ! परवां आलों नव्हतो कां तुमच्याकडे ? " जयपालनें विचारलें.

" माझ्याकडे ना ! अचलेला भेटायला म्हणून आला होसात. मी बोलावलं म्हणून नव्हे आं ! हूंः शोभेनें सोडलेल्या शेवटच्या सुस्काऱ्यांत एक विपरीतच ध्वनी प्रगट झाला.

जयपालाला कसेसेंच वाटलें. टेबलावरचें वर्तमानपत्र चाळीत तो तुटकं-पणेंच म्हणाला.

" मला आतां काम आहे. तुम्ही जा. "

" चला किरात, ते येणार नाहींत तर आपण तर कशाला थांबा ! " असें म्हणून शोभानें किराताची हॅट मुद्दामच उचलून त्याला दिली, व ती त्याला खेटून उभी राहिली.

जयपालनें वर पाहिले नाहीं, त्यामुळें शोभा खजील झाली. किरातशीं लगट केल्यानें जयपालाच्या ठिकाणीं मत्सर जागृत करून त्याच्या भावनांना धक्का देऊन त्याची बेफिकीर वृत्ती घालवून देऊं अशी तिला आशा वाटली होती. परंतु जयपालानें वर पाहिलेंहि नाहीं, यामुळें तिचा तो सर्व डाव वांया गेला. किरातच जेव्हां थट्टेनें दचकल्यासारखें करून शोभापासून मुद्दामच दूर सरकला तेव्हा तर शोभा फारच वरमली. जयपाल तिच्याकडे पाहत नव्हता हें एक प्रकारें बरेंच झालें असें तिला वाटलें.

रस्त्यानें जातांना किराताला शोभा म्हणाली,

" मुद्दामच मी तुम्हाला चला म्हटलं. अचला तुम्हाला पाह्यची आहे ना ! बरं झालं जयपाल नाहीं आले ते. अन् मला वाटतं कीं लवकरच जयपाल तिला माझ्या येथून हालवतील व दुसरीकडे कुठंतरी ठेवतील. माझ्या इथं असली म्हणजे वेळीअवेळीं जाणंयेणं भेटणं बसणं कसं जमणार या दोघांचं ? "

" असं ? "

" मग काय ऐकतां ! तिच्या नवऱ्यानं पत्र धाडलन् होतं वनिता-विश्रामला. त्यांत त्यानं धडधडीत लिहिलं होतन्, कीं अचलेची वर्तणूक चांगली नाहीं. तिला वसतिगृहांतून म्हणून तर काढली रायबहादूरांनी ! ती रडली काय अन् भेकली काय ! तऱ्हातऱ्हा तिनं केल्या. जयपालांच्या सांगण्यावरून नसतं धोंगडं माझ्या गळ्यांत पडलं. मी म्हणतें घरांत माझ्या हाताखालीं कामाला माणूस झालं. मी त्यांना म्हटलं आहे, कीं तिची सोय दुसरीकडे कुठंतरी लावा. मला वाटलं होतं जयपाल तिला म्हणतील कीं तुझी तूं निराळी सोय बघ आपली. जयपालांनीं कशाला हें धोंगडं गळ्यांत घेतलं आहे, कुणाला ठाऊक. "

" जयपाल भोळा आहे. आम्ही सत्याग्रहांत दोघेजण एकदमच होतों. हा आपला भाविकपणानं शिस्त पाळायचा. मी फळांच्या करंड्या, मिठाईची शिसरें ह्यांचा यथेच्छ समाचार घ्यायचा. तत्त्वनिष्ठ माणसं मूर्खच असतात. त्यांतलाच हा जयपाल ! ह्याला कींव आली असेल अचलेची, म्हणून तिला त्यानं आसरा दिला. घरींसुद्धां त्यानं तिला ठेवली असती. पण जयपालचीच सोय कशीबशी घरीं लागते. खरं पाह्यलं तर जयपालनं धाकट्या भावांच्यासाठीं येवढं केलन्. अजूनहि त्यांनीं मिळवलेल्या पैशांतूनच ते चैन करीत आहेत. असं असून सुद्धां जयपालशीं भाऊ भांडतात, अन् आई उलट धाकट्या भावांचा कड घेते. "

" तेंच ना ! जयपाल पण स्वभावानं भारीच गरीब ! त्यांच्या ह्या स्वभावामुळं त्यांच्या बायकोस कांहीं कमी नाहीं छळ सोसावा लागला ! मेली अन् सुटली बिचारी सासूरवासांतून. जयपालांना आतां पश्चाताप वाटतो. म्हणतात, कीं इतर मंडळींच्या मर्ज्या संभाळतां संभाळतां बायकोचा छळ मी डोळयांनीं पाहत राहिलों. अन् आतां मी कशाला त्यांना दुखवूं ! अन् दुखवूं तरी कोणासाटीं ! ! माझ्या गरजाच इतक्या थोड्या आहेत, कीं माझं कशा-वांचूनसुद्धां अडायचं नाहीं. भारीच पण भिडस्त स्वभाव त्यांचा. नाहीं ? "

" मला तर त्याची थट्टासुद्धां करणं जिवावर येतं. "

" पण ही अचला आल्यापासून जयपालांची चलबिचल उडाली आहे. त्यांच्यासारख्या प्रतिष्ठित माणसांनीं विचार नको कां करायला कीं आपल्याला ह्या बाईच्यामुळं कमीपणा येईल ? लोकांना काय ! वाटेल ते बोलतात. "

" असेल ! जयपाल विधूर आहे, मी म्हणतो समजा त्याचं अन् अचलेचं कांहीं असलं तसं तरी काय हरकत आहे ? त्याला तरी एकादी मैत्रिण असावी असं नसेल कां वाटत ! "

" पुरे ! असेल ते विटवा अन् नसेल ते भेटवा. "

" हें पहा. जयपाल भोळा आहे. त्याच्याशीं स्पष्ट बात केल्याशिवाय त्याला कांहीं समजायचं नाहीं. तुमचं हेंच चुकतं ! "

" काय चुकतं ? "

" हेंच ना ! जयपालला गमवून बसाल आं ! "

" छे. ! तसं मुळींच नाहीं. माझ्या मनांत सुद्धां कल्पना आली नाहीं. बरेच आहांत कीं ! माझ्याबद्दल असंच वाटतं ना तुम्हाला ? "

" केवळ स्वतःच्या बचावासाठीं ही कल्पना सुचली मला. नाहीं म्हटलं, माझी ना नाहीं त्याला. "

" तर तर ! पण माझी तयारी पाहिजे ना ! त्यापेक्षां मी अशी आहे कीं काय वाईट आहे ? "

" खरंच ! तुमचं कांहीं कुठं जमतं आहे कीं नाहीं ? मला आज पुनर्विवाह मंडळाचे चिटणीस भेटले होते. "

" रोज कुठल्या कुठल्या स्थळांबद्दल विचारीत असतात. मीं त्यांना सांगितलं आहे कीं, गरिबी असली तरी चालेल. पण वयांत अंतर जास्त नको अन् स्वभावानं माणसं चांगली पाहिजेत. संसारी पाहिजेत. कुणाची पोरकी मुलं संभाळण्याची नाहींतर कुणा म्हाताऱ्याची सुश्रूषा करण्याची हौस फेडण्यासाठीं कांहीं आतां पुनर्विवाह करायचा नाहीं. त्या सर्व हौशी ओ येईतोवर फिटल्या आहेत. मनासारखं कांहीं स्थळ आणीत नाहींत अन् उलट मलाच म्हणतात कीं, चिकित्साच फार. गेलीं तीन वर्षं पुनर्विवाह मंडळांत धक्के खाऊन खाऊन मी कंटाळले. आतां ठरवलं आहे कीं, आपलं आपणच पाहणं. "

" पहावंच काय पण जमवून सुद्धां टाकावं. "

" ते सगळं खरं. ओळखी पाळखी सहज होतात. माणसं येणीजाणीं सुरुं करतात. पण लग्नाची गोष्ट काढली कीं दुसऱ्या दिवसापासून तोंड चुकवूं लागतात. म्हणून मी होऊन पुनर्विवाहाची भाषाहि बोलण्याचं सोडून दिलं आहे. "

" असं ना ? डोक्यावरचं ओझं खांद्यावर आल्यासारखं वाटत असेल तुमच्या मित्रांना ! "

" मला काय माहित त्यांना काय वाटतं तें ? "

" असंच वाटणार ! पण अशांनीं सावजं तुमच्या हातांतलीं निसटून जाणार. जयपालचंच बघानात ! राजकारणांत शिक्षा भोगून बाहेर आला,

समाजसेवा करतों म्हणून तिरीमिरीत निघाला अन् बायकांच्या घोळक्यांत येऊन पडला. मला तर वाटलं होतं. ”

“ काय ? ”

“ कीं हा विधूर आहे, बायकांच्या संस्थेंत हिय्या देऊन राहाला आहे, तर त्याचा कुणातरी विधवेशीं—कशाला तुमच्याशींच—अभिनंदनीय विवाह झाल्याचं वर्तमान एकाद दिवशीं ऐकू येणार. गांवांत तुम्हां दोघांबद्दल लोक बोलूं लागले आहेत. ”

“ पण ही अचला मधेच उपटली ना ! ”

---

# ४

अचलेची व्यवस्था नीट लागली, हें ऐकून विलासाच्या क्रोधाग्नीचा स्फोट झाला. वास्तविक अचलेला विलासानें टाकून दिली होती. तिची पुढें काय दशा होते, हें जाणण्याबद्दलहि त्यानें उत्सुक असण्याचें कारण नव्हतें. परंतु द्वेष हा सूडाचा आनंद उपभोगण्यासाठीं उत्सुक असतो. द्वेषाचा विषय आपल्या दृष्टीआड झाला येवढ्यांतच आनंद न मानतां त्या व्यक्तीच्या सर्व बाजूंनीं हाल-अपेष्टा होत असल्याचें पाहण्यापुरता परमानंद द्वेषाला कुठलाच नसतो. ज्या प्रमाणांत द्वेष जास्त त्या प्रमाणांत सूडाची इच्छा जास्त आणि ज्या प्रमाणांत द्वेषभूत व्यक्तीचे हाल होतील त्या प्रमाणांत आनंद जास्त अशी ही मालिका आहे. विलासाची इच्छा अशी, कीं अचलेला बाहेर कुठें थारा मिळू नये, तिनें दीन होऊन शरण यावें, निदानपक्षीं विलासाच्या द्वेषामुळें माणूस किती जमीन-दोस्त होतें, ह्याची प्रतीती सर्व जगास तिच्या अनन्वीत हालाखीनें पटवून द्यावी. पण ती सर्व त्याची मनीषा फोल ठरली. उलट अचलेला बाहेरच्या जगांतून सहानुभूति मिळूं लागली ह्याचेंच त्याला विशेष वैषम्य वाटूं लागलें. त्या सहानुभूतींत त्याला स्वतःच्या तिरस्काराची आणि पराजयाची पडसांवली दिसूं लागली आणि त्या पडसांवलीच्या भुताटकीनेंच तो भयभीत झाला. वनिताविश्रामांतून अचलेला काढून टाकण्याचा त्यानें डाव घातला. पण तो फक्त वसतिगृहापुरताच सफल झाला. राह्यलाच जागा राह्यली नाहीं म्हणजे आपो-आपच अचला शरण येईल ही त्याची समजूत खोटी ठरली. तिला जयपालानें

आसरा दिला, विलासाच्या मूढाच्या वणव्यापासून तिचा बचाव झाला, म्हणूनच त्याचा क्रोध अनिवार झाला.

उषा ही विलासाची दुसरी बायको. अचला घरांतून गेली येवढ्यानेंच तिच्या सवतीमत्सराची तृप्ती झाली नव्हती. अचला स्वरूपानें सुंदर आहे, ही गोष्ट मनांत सारखी डांचत होती. काढून दिली तरी ती सवत आणि तीहि स्वरूपवान असावी, ही कल्पनाच मुळी तिला असह्य झाली. तिच्याहि सवतीमत्सराला वाटे, कीं अचलेचा नायनाट व्हावा. पण हें तिला स्वतः साधतां येणें शक्य नव्हतें. तेव्हां केवळ अचलेच्या रोज पाहायला मिळावी, तिच्याबद्दलच्या खऱ्याखोट्या कंड्या राजमानास रोज सांगतां याव्यात आणि त्यांच्या तिरस्काराला सतत तेवत ठेवावें, असें उषेला वाटे. ऐवढ्यासाठीं तिनें विलासाच्या नकळत वनिताविश्रामांत शिवणकामाच्या वर्गात नांव घातल्याला चार दिवस होऊन गेले होते. तिची आणि शोभाची चांगलीच ओळख झाली होती. आणि आतां तर त्यांची खासगी कुजबूजहि अधून मधून रोज होऊं लागली होती.

" ही हिथं शिकायला राहिली आहे कां कशाला राहिली आहे ? " उषेनें शोभामास्तरणीला विचारलें.

" तुम्हीच बघा म्हणजे झालं. मी जर कांहीं म्हटलं तर मला दुसरीं माणसं म्हणतात तुम्हाला अचलेचा हेवा वाटतो. " शोभाबाईनें उत्तर केलं.

उषा आणि शिवणबाई शोभा शिवण्याच्या वर्गाला लागूनच्या बाहेरच्या सज्ज्यांत उभ्या होत्या.

" हेवा अन् तो कशाबद्दल ? " उषेनें कपाळाला आंठ्या घालून विचारलें.

" दुसरा कशाबद्दल असणार ! अचला रूपानं सुरेख आहे ना ! आपण कांहीं तिच्याविरुद्ध बोललं म्हणजे पुरुषांना वाटतं कीं मत्सरानीं ह्या बोलतात. रूप असलं तर तिचं तिला, मला काय होय त्याचं ? पण आपली तुम्हाला पुरुषांची रीत सांगतें. "

" होय ना ! सगळ्या पुरुषांची एकच रीत. इकडे माझ्याशीं लग्न केलं आहे ना ! लग्नानंतर मला काय म्हणतात कीं अचलेला आपल्या हिथं राहूं दिली तर काय हरकत आहे ? घरांत गडीमोलकरीणीसारखी सुद्धां राह्यला ती तयार आहे. मी साफ सांगितलं कीं, मी जिवंत आहे तोंवर तिला घराच्या

उंबरठ्याच्या आंत पाऊलसुद्धां टाकूं देणार नाहीं. म्हणे मोलकरणीसारखी राहील! अशी सुरेख मोलकरीण घरांत आली तर ती घरधनीण व्हायची हां हां म्हणतां! अन् ही तर काय बोलून चालून लग्नाची बायको. हिनं इकडच्चं मन वश केलंन् कीं मलाच ती मोलकरणीसारखी वागवील. बोलून चालून पुरुषांचं मन! कोणत्या वेळेला कुठल्या बाईकडे तें जाईल याचा कांहीं नेम असतो का! मला तर सुरेख बायकांची भारीच भीति वाटते."

"नाहींतर काय! पुरुषांचा स्वतःच्या मनावर कुळींच ताबा नसतो म्हणून असल्या बायकांना भ्यावं लागतं आपल्यासारख्यांनी."

"आपल्यासारख्यांनीं म्हणजे?"

"म्हणजे रूपानं साधारण असलेल्या बायकांनीं हो. रूपापुढं पुरुषांना गुणाची मुळीसुळी किंमत नसते. सुरेख असली म्हणजे मग ती अडाणी असो, कीं वाईट चालीची असो, तिला ते डोक्यावर घेऊन नाचतील."

"शी: ! ह्या असल्या बायकांना लाज तरी कशी वाटत नाहीं कुणास ठाऊक? आपल्या ज्याच्या त्याच्या पुढं पुढं करायला!"

"अन् दुसऱ्याच्या अन्नांत माती कालवायला! उगीच तुम्ही बघा. हिच्या दिवसाच्याकाटीं ऑफिसांत किती खेपा होतात त्या. शेकडो मुली शिक-ताहेत. पण हिच्यासारखी हीच."

"म्हणजे!"

"म्हणजे काय? जयपाल आहेना?"

"होय. मग?"

"मग काय! त्यांच्या भोंवती भोंवती घिरट्या घालीत असते."

"खरंच का?" उषानें डाव्या हाताचा मिटलेला पंजा हनुवटीखाली धरून म्हटलें. "सगळे म्हणतात, जयपाल म्हणजे मोठे गृहस्थ आहेत ऐक. सत्याग्रहांत शिक्षा भोगून आले आहेत. हरीजन कार्य करतात. शिवाय काँग्रेस पक्षांतले मोठे कार्यकर्ते आहेत म्हणे! समाजसेवा करायची म्हणून ते वनिता विश्रामांत चिटणीसाचं काम करतात. येवढा पैसा त्यांनीं धंद्यांत मिळाला मिळाला तो म्हणे त्यांनीं भावांना देऊन टाकला. त्यांना बायको मूल कुणी नाहीं

म्हणून त्यांनीं समाजकार्याला वाहून घेतलं आहे. इकडे तर जयपालांचीं खूप स्तुति चाललेली असते. मी समजत होतें हा खरोखरच कुणी महात्मा असेल."

"महात्मा आहेच. पण ही बया आल्यापासून सर्व मनु बदलला. बरं ह्या बाईशीं तरी विचार करायला नको का कीं, जयपाल म्हणजे आज ह्या संस्थेचे आधार आहेत. ही संस्था कर्जापायीं डबघईला आली होती, पण जयपालनींच गुजराती शेटीयांकडून मोठमोठ्या देणग्या मिळून संस्था नावारूपाला आणली. तर हिनं विचार करायला हवा, कीं जयपालांच्या अब्रुला, संस्थेच्या नांवाला धक्का लागेल असं आपण करूं नये. पण हिनं अगदी ताळच सोडला आहे."

"असं ना! बघा म्हणावं येऊन डोळ्यानींचं स्वतःच्या! म्हणतात एकादवेळेस कीं अचला हट्टी असली तरी वर्तनानं शुद्ध आहे. मी विचारलं-सुद्धां कीं, ही गोष्ट मला कशाला सांगतां! म्हणजे पर्यायानं असंच सुचवतां तुम्ही की, माझ्याबद्दल तुम्हाला खात्री नाहीं? मग गप्प बसतात, सुस्कारे टाकतात."

"सुस्कारे कशाबद्दल?"

"दुसरे कशाबद्दल असणार? अचलेला घरांत नांदायला आणायचं स्वारीच्या मनांत आहे. पण मी खंबीर आहेना!"

"तिच्या वर्तनाबदल विलासांना खात्री आहे म्हणतां अन् आमच्या संस्थेला पाठविलेला पत्रांत तर त्यांनीं अचलेल्या वर्तनाबद्दल वाटेल तसं लिहिलं आहे!"

"ते सगळं ढोंग आहे ढोंग! तिला कुठं आसरा मिळू नये म्हणून पत्रांत लिहिलं असेल. पण पोटांत कावा निराळाच आहे. तिला कुठं आसरा मिळाला नाहीं म्हणजे ती आपोआप शरण येईल. निदान कोर्टांत अन्नवस्त्राचा दावा लावील अन् मग स्वारी खुश्शाल सांगेल मी तिला संभाळायला मी तयार आहे. बरं मी वकिलांना विचारलं तर ते म्हणतात, अचला जर घरांत राहाला आली तर तुमच्याच्यानीं कांहीं सुद्धां आडकांठी आणतां यावयाची नाहीं."

"म्हणतां तरी काय?"

" अशीं माझ्या कर्माची गत आहे. सांगा तुम्हींच कीं मला अन्न तरी गोड लागत असेल का ! अन् मनाला स्वस्थता नसली म्हणजे अंगावर तेज कुठून राहणार ! अन् उलट मलाच विचारतात कीं तूं आतांशा काळवंडलीस कां ? मी म्हटलं, मी कांहीं काळवंडलें नाहीं. अचलेला पाहिलं असेल कुठं तरी म्हणून मी काळवंडलेली दिसूं लागलें. तर आपले खुशाल हंसतात. मी इतकी कांहीं मूळची काळी नाहीं आहे रंगांनं ! पण मनाला स्वस्थता नसली ना म्हणजे माझी आंगाची कातडी फारच काळी दिसूं लागते. "

" अहो तुमचा काय अन् माझा काय, तोंडाचा रंग आणि सगळ्या अंगाचा रंग एकसारखा आहे. अचलेचा तोंडाचाच रंग उजळ आहे, हाता-पायाचा रंग त्या मानानं झांका आहे. तुमच्या माझा रंग सारखाच नाहीं का ! ह्याला आतां काळा म्हटला म्हणजे झालंच ! निमगोऱ्या रंगाला काळा रंग म्हटल्याचं मी ऐकलं नाहीं कधीं. "

" पुरुषांच्या जवळ काळा गोरा असे दोनच शब्द स्त्रियांच्या रंगाबद्दल असतात. आवडूं लागलीं म्हणजे तिला उजळ म्हणतील, नावडूं लागली म्हणजे तिला काळवंडलेली म्हणतात. हिथून तिथून पुरुष एकजात लबाड असतात. "

" कसे बोललांत ? "

" खरंच ! राग येऊं देऊं नका कांहीं विचारलं तरी "

" छे राग नाहीं येणार. विचाराना ? "

" मी तर ऐकलं होते कीं, जयपाल म्हणे कुणा मास्तरणीशीं पुनर्विवाह करणार होते ! "

" असेल ! पण आतां त्याचं काय ? "

" नाहीं. अचला जयपालांच्या भजनी लागली आहे म्हणून विचारते. "

इतक्यांत अचला ऑफिसांतून बाहेर आली, शोभानं व उपानें तिला परत जातांना पाहिलें.

शोभाचा चेहरा लाल झाला, आणि खजीलहि झाला.

" जळळं मेलीचं लक्षण " असें पुटपुटत शोभा पाय आपटीत ऑफि-सकडे गेली.

उगा जागेवरच उभी राहिली. तिला शोभाच्या बोलण्याचा आणि वागण्याचा उलगडाच होईना.

दुसऱ्याच दिवशीं विलास वनिता विश्राममध्यें आले. जयपालनें त्यांचें स्वागत केलें. संस्थेची माहिती सांगितली. शोभा ऑफिसांतच घुटमळत होती. विलासनें त्यांना खुर्चीवर बसायला सांगितलें. त्यावेळीं शोभा म्हणाली, ' नाहीं. आपल्या मिसेस शिकायला येत असतात. शिवणकामाचा वर्ग पाहून जायचा जातांना. "

" हं पाहतों. तुम्ही बसाना ! अन् जयपाल मला तुमच्या संस्थेसंबंधी कांहीं बोलायचं आहे. " विलास म्हणाला.

" बोला कीं ! अन् तुम्ही शोभाबाई. "

" त्या असल्या तरी कांहीं हरकत नाहीं. बसा ना तुम्ही. " विलास मधेंच म्हणाला.

" बरं ! काय बोलायचं आहे आपल्याला ? " जयपालानें विचारलें.

" मला असं सांगायचं आहे कीं चांगल्यांच्या बायका येथें शिकायला येतात, तेव्हां येथें एकंदर शुद्ध वातावरण असलं पाहिजे. "

" अलबत. म्हणून तर पुरुषांना आम्हीं संस्थेतून हिंडवून दाखवीत नाहीं. कुणी माणसं कुठल्या हेतूनं येतात. कुणी कुठल्या हेतूनं येतात. म्हणून नियमच केला आहे कीं, पुरुषांनीं फक्त ऑफिसांत भेटायचं. मी सुद्धां ऑफिस सोडून संस्थेच्या इमारतींत इकडे तिकडे कामाशिवाय फिरकत नाहीं. "

" माझा कटाक्ष संस्थेंत घेतल्या जाणाऱ्या स्त्रियांबद्दल आहे. "

" कबूल. त्याचाहि योग्य बंदोबस्त आम्ही घेतों. कुणातरी दोन प्रतिष्ठित माणसांचीं शिफारसपत्रं असतील तरच आम्ही कुणाला संस्थेंत दाखल करितों. आणखी विशेष आमचं पाहणं असं असतं, कीं संस्थेंत दाखल झाल्यावर विद्यार्थिनींची वागणूक चांगली असते कीं नाहीं. "

" पण संस्थेंत दाखल होण्यापूर्वीची वर्तणूक संशयास्पद असेल तर ? "

" बोलून चालून संशयास्पद ! तिचा निर्णय नंतरच्या वागणूकीवरून आम्हांला करतां येतो. आपल्या लोकांना वाटेल त्या कंड्या कुणाहि बाईबद्दल

उठवाव्याशा वाटतात. त्या सर्वच खऱ्या धरून चालल्या तर मोठाच अनर्थ होईल."

"पण खुद्द बाईच्या नातेवाईकांनीं जर वर्तनाबद्दल तक्रार केली तर?"

"जिव्हाळ्याची नातेवाईक मंडळी झालेल्या चुकांवर पांघरूण घालतात. आणि जीं स्वतःला जवळचीं नातेवाईक मंडळी म्हणवतात आणि वर्तनाबद्दल तक्रारी करतात, त्या तक्रारी हिथून तिथून खोट्या असतात असा आमचा अनुभव आहे. बहिणीविरुद्ध तक्रार करणारा भाऊ शेवटी चुलत भाऊ निघतो, मुलीबद्दल तक्रार करणारी आई, शेवटीं सावत्र आई निघते. कित्येक वेळीं केवळ सूड उगविण्यासाटीं भलतींसलतीं विधानं करतात नात्याचीं मंडळी. दिराशीं भांडून भावजय निघाली अन् संस्थेच्या आश्रयाला येऊन राहिली, कीं केवळ तिला थारा मिळूं नये येवढ्यासाठीं दीरसासरे पुतणे त्या बाईच्या वर्तनाबद्दल वाटेल ती विधानं करतात. एकंदरींत असं अनुमान निघतं, कीं वर्तनाबद्दल आलेली तक्रार द्वेषानं, अगर सूड उगविण्यासाठीं म्हणून केलेली. तेव्हां आमचं धोरण असं आम्हीं ठेवलं आहे कीं, अशा तक्रारींच्याकडे फारसं लक्ष द्यायचं नाहीं."

"हें तुम्हीं विधवा स्त्रियांच्याबद्दल म्हणतां ना!"

"मी सर्वांच्याबद्दल बोललों. कुमारिका, सुवासिनी आणि विधवा सगळ्यांबद्दल मी बोललों."

"सुवासिनी म्हणजे नवऱ्यांनीं टाकून दिलेल्या ना?"

"होयच तर! नांदत्या सुवासिनी संस्थेंत येतील कशाला! अन् एकादी कला शिकायला कांहीं दिवस आल्या तरी त्यांच्याबद्दल तक्रार तरी कोण कशाला करणार आहे! आमच्या संस्थेंत विशेष भरणा असतो फसविलेल्या कुमारिकांचा, परित्यक्तांचा अन् विधवांचा."

"मी परित्यक्तांबद्दल विचारतों, कीं समजा त्यांच्या नवऱ्यांनीं जर तुमच्याकडे तिच्या वाईट वर्तणुकीबद्दल तक्रार केली तर?"

"मी असं विचारतों, कीं ज्या नवऱ्यानं आपल्या लग्नाच्या बायकोला घरांतून घालवून दिली असेल त्याला तिच्या अब्रूबद्दल कितपत चाड असणार? काळजी असणार?"

"कां बरं नाहीं?"

"तरुण पत्नीला घरांतून हांकलून देणाऱ्या नवऱ्याला एवढं तरी माहित पाहिजे, कीं हिचं रक्षण आपण काढून घेत आहोंत तर तिला आपण आपल्या हातांनीं मवाल्यांच्या हवाली करीत आहोंत. अन् मग तिच्या हातून चुकी झाली तर अशा नवऱ्याला त्याबद्दल बोलण्याचा काय अधिकार?"

"कां नाहीं अधिकार? टाकून दिली तरी ती लग्नाची बायको आहे. तिनं शुद्ध राह्यलं पाहिजे."

"मिस्टर विलास, आपण ही तात्विक चर्चा करीत आहोंत ऑं! स्पष्ट बोललों तर त्याचा विपर्यास मात्र करून घेऊं नका. नवऱ्यानं दुसरं लग्न करावं, संसारांत दंग व्हावं. तो पुनः नांदायला नेईल अशी आशाहि उरली नसेल अशा बाईनं काय करावं? एक माणूस म्हणून विचार करा. केवळ पोटाला गोळाभर अन्नसुद्धां तिला तिचा नवरा देत नाहीं आणि तिनं मात्र शुद्ध राहावं असं त्याला कोणत्या तोंडानं म्हणता येईल?"

"खाण्यापिण्याचा अन् शुद्ध राहण्याचा काय संबंध बुवा?

"संबंध असा कीं तिनं चांगलं राह्यचं ते कुणासाठीं म्हणून?"

"कुणासाठीं म्हणजे नवऱ्याच्या अब्रूसाठीं!"

"आणि जो हिच्या जिवावर, सुखावर उठला आहे असल्या नवऱ्याची अब्रू हिनं संभाळायची! मी असं विचारतों कीं असल्या नरराक्षसाला समाजांत कांहीं अब्रू असते कां! नाहीं असावी का?"

"कां नाहीं असणार? बायको खराब निघाली म्हणजे नवराहि खराब ठरतो कीं काय?"

"खराब बाईला घराबाहेर काढून लाऊन तिला वणवण फिरायला लावणारा नवरा आपल्या बेअब्रूची मशाल रस्तोरस्ती पाझळीत मिरवीत ठेवतो. अगदीं खराब वर्तनाची आहे अशी आपण कल्पना केली तर अब्रूदार नवरा तिच्या दुष्कृत्यावर पांघरूण घालील. नाहीं घालतोसुद्धां. बिनअब्रूच्या नवऱ्याला असा काय बोलण्याचा अधिकार कीं बायकोनं मात्र चांगलं राहावं!"

नेदान तिच्या अब्रूसाठीं तरी तिनं चांगलं वागायला नको का!"

" हें म्हणणं बरोबर आहे. टाकून दिलेली बाई होतां होईतों नेकीने वागते."

" होता होईतों कां ! कांहींहि झालं, कसलीहि अडचण आली तरी तिनं चांगलं राह्यलं पाहिजे."

" आणि तें कां म्हणून ? नवऱ्यानं टाकून दिली एवढ्यानंच तिच्या सर्व भुका नाहींशा होतात कां ! कीं आपले अंगावरचे दागदागिनें जसे नवरा काढून घेतो तशी तिची सुखवासनाहि तो तिच्यापासून हिसकावून घेतो. तीहि माणूस आहे. पहिली बायको आवडेनाशी झाली म्हणजे पुरुष दुसऱ्या स्त्रीशीं लग्न करतोच ना ! तें तरी तो कशासाठीं करतो ?"

" पुष्कळ कारणं असतात त्याला."

" असतील; पण मुख्य कारण वासनातृप्ती असते. एकट्या पुरुषालाच काय ती वासना असते आणि स्त्रीला नसते असं का आहे ? ती झाली तरी माणूसच आहे. तिलाहि वासना असायचा. अन् त्या वासनांची तृप्ती तिनं कशी करायची ह्याचा विचार कुणी कधीं करतो का ! माणसाला अन्नावांचून राहता येत नाहीं तसं विषय– सुखावांचूनहि जगतां येत नाहीं."

" बाल विधवा बऱ्या राहतात त्या !"

" ज्याचे नवरे प्रेमळ आणि चांगले असतात, अशांच्या विधवा नुसत्या प्रेमाच्या स्मृतीवर तशाच राहतात. ज्याचं नवरे मनासारखे नसतात त्या नवरा मरतांच शक्य असेल तर पुनर्विवाह करतातहि. आणखीन् विधवांची आपण समाजात इतकी कुचंबणा केलेली असते कीं तिला आपले विचार बोलून दाखवायचं आणि ते अंमलांत आणायचं धैर्यच होत नाहीं."

" विधवांचीं गोष्ट निराळी तर खरीच. त्यांचे नवरे मेलेले असतात, पण परित्यक्तांचे नवरे चांगले जिवंत असतात ना !"

" होय जिवंत असतात छळायला ! आणि अनान्वित आरोप करायला. खरं म्हटलं, म्हणजे असा नवऱ्यांना लाजवायला पाहिजेत कीं, आपण आपली जबा-बदारी पार पाडीत नाहीं म्हणून. टाकलेलीवर सूड उगवण्यांत काय पुरुषार्थ आहे ? आणि तोहि पण इतक्या नीचपणानं उगवायचा, कीं तिला गोळाभर

अन्न सुद्धां कुणी घालूं नये अशी अधम इच्छा ठेवायची. आणि म्हणे टाकले-लीनं चांगलं राहवं, कां तर त्यांच्या अब्रूला जपण्यासाठीं. ”

“ जयपाल, असं अद्वातद्वा बोलण्याचं तुम्हाला कारण नाहीं. एका संस्थेचे चिटणीस म्हणून तुमची जबाबदारी तुम्ही विसरला. ”

“ मी जबाबदारी विसरलों नाहीं. तुम्ही मात्र आपला अधिकार विसरला आहांत. संस्था पाह्याला येणाऱ्यानं इतक्या खोल पाण्यांत शिरण्याचं आणि बाचाबाचीवर येण्याचं कांहींच कारण नाहीं. ”

“ मी नुसता प्रेक्षक म्हणून आलो नाहीं. माझी बायको ह्या संस्थेंत शिकत आहे. संस्थेचा कारभार सोंवळा राहाला पाहिजे असं बजावण्याचा हक्क आहे. ”

“ आणि संस्थेचा कारभार स्वच्छ सोंवळा चालला आहे हें निक्षून सांगण्याच्या हक्क माझा आहे. मला वाटतं ह्यापेक्षां जास्त तपशीलांत आपणांस शिरतां येणार येणार नाहीं. ”

“ कां नाहीं येणार ? माझी बायको जिथं शिकायला येते, त्या शाळेंत अचला येतां कामा नये. घरंदाजाच्या बायकांच्या अब्रूचा हा सवाल आहे. ”

“आणि अचला हीमुद्धां घरंदाजाचीच बायको आहे. अचला जर एकाद्या बिनअब्रूच्या गृहस्थाची बायको असेल, तर आपली पत्नी हीसुद्धां बिनअब्रूच्या नवऱ्याची बायको ठरेल. घरंदाजांच्या बायकांची अब्रू जाऊ नये, त्यांना कुंटण-खान्यांत किंवा मुसलमानांच्या घरांत कुणी घालू नये, म्हणूनच अचलेसारख्या परित्यक्तांना संस्थेकडून आसरा मिळत असतो. नवरे आपलं कर्तव्य विसरले तरी आमच्या सारख्या संस्थेला तें विसरतां येत नाहीं. ”

“ अचला वर्तनानं खराब आहे. ”

“ पूर्वी कुणा भगिनीच्या हातून चुक झाली असेल, तर तीहि सुधार-ण्यासाठीं संस्थेशिवाय दुसरी कुठे जागा आहे का ! आपण तिला घरी राह्यला घेऊन जातां का ! ”

“ छे ! अशा बदफैली बायकोला मी घरीं घेऊन जाऊं म्हणतां ! ती माझ्या घराचं दुकान करील. ह्या संस्थेतच तिनं दुकान केलंच आहे ना नाहीं तरी ? ”

" विलास, तुम्ही मर्यादा सोडून बोलूं लागलांत. मी खादीचा पोषाख घालतो म्हणून तुमचं वाटेल तसलं बोलणं ऐकून घेईन असं समजूं नका. संस्थेची आणि संस्थेतील व्यक्तींची बदनामी मी कधींच ऐकून घेणार नाहीं. "

" काय कराल ! मी तुमच्यावर आरोप ठेवतो कीं तुमचा अन् अचलेचा............. "

जयपाल खुर्चीवरून ताडकन उठला त्यानें विलासाचें नरडें धरलें आणि विलासाचें बोलणें अर्धेच राहिलें. विलास लटलट कापूं लागला. आणि गळा कसाबसा सोडवून तो बाहेर पडला. जातांना तो पुटपुटला. " हरामखोराला दाखवतोंच हात. चल्रे फरासखान्याकडे मोटार घे. "

शोभा तो सर्व संवाद ऐकत होती, तिचीमुद्रा बोबडी वळली. विलास गेल्यावर ती जयपाल जवळ हळूच गेली आणि म्हणाली.

" अशांशीं फार बोलण्यांत अर्थ नसतो. "

" बरोबर आहे. रागाच्या आधीन मी आज झालें हें बरोबर झालं नाहीं. " जयपाल खुर्चीवर बसला आणि त्यानें आपलें डोकें दोन्ही हातानें घट्ट दाबून धरलें.

शोभा जवळचा पंखा घेऊन वारा घालूं लागली. थोड्या वेळानें जयपाल तिला म्हणाला.

" शोभाबाई, हा तुमच्यावरही किटाल आपल्याशिवाय राहणार नाहीं. हिथं अचला राहते, हें त्याला पाहवत नाहीं. पाहतो मी विचार करून. अचलेला तुमच्या हिथून हालविली पाहिजे आतांच्या आतां. "

"ती कां म्हणून ? मला काय तो त्रास देणार आहे ! अन् तुमच्यासाठीं मी तो सोशीन. कांहीं दुसरीकडे तजवीज पाहूं नका. "

" शाबास ! मला वाटलं ह्या लढ्यांत मीच एकटा मार खात राहणार. बघा हो. वेळींच सावध व्हा. संकटं सोसावीं लागतील. नांत्र खराब होईल. "

" चालेल. संस्थेंत राहायचं तर हें सगळं सहन केलंच पाहिजे. तुम्ही तरी सहन करणार आहांतच ना ? "

" होय ! "

" मग मीहि तुमच्याबरोबर आहेच समजा ना ! "

" बरं चला. "

शोभानें समाधानाचा सुस्कारा सोडला. आणि हळू आवाजांत म्हणाली,

" जयपाल, तुम्हीं बरेच दमलां आहांत ? घरीं येतां कां ! "

" नको. सभेची वेळ झाली आहे. मला गेलं पाहिजे, " असें म्हणून जयपाल बाहेर निघाला.

शोभा मात्र तिथेंच ऑफिसांत बराच वेळ विचार करीत उभी राहिली. जातांना ती पुटपुटली. " अचलेला आपल्या हिथंच ठेऊन घेतली पाहिजे. सगळया गोष्टी आपल्या ताब्य राहतील. "



जयपाल आणि विलास ह्यांच्या बोलाचालीची आणि मारामारीची हकीगत गांवांत एकदम सर्वत्र पसरली. जयपालाला विलासानें बेदम मारलें, अशी बातमी ऐकून जयपालचे स्नेहीसोबती त्याच्या समाचारास धाऊन आले, तर विलासला जयपालनें भयंकर दुखापती केल्याचें ऐकून विलासचे ऋणानुबंधीं त्याची विचारपूस करण्यासाठीं भोंवतालीं जमा झाले. संस्थेंत ही मारामारी झाल्याचें वृत्त बाहेर येतांच संस्थेचे चालक आणि संस्थेंत शिकणाऱ्या विद्यार्थीनींचे मालक ह्यांचीहि संस्थेच्या आवारांत येजा सुरू झाली.

येवढी खळबळ एऱ्हीं उडाली नसती. पण बाचाबाची झाल्याचें वर्तमान किराताला शोभाबाईनें सांगितलें, आणि किरातानें 'विलासांनीं वनिताविश्रामचे चिटणीस श्री. जयपाल यांच्यावर खुनी केला आणि शिवीगाळ केली. प्रकरण कोर्टांत जाणार असल्याचें समजते' अशी बातमी सर्व वर्तमानपत्रांतून ठोकून दिली. विलास जयपालवर कांहींतरी किटाळ आणणार, तेव्हां अगोदरच आपण जयपालाबद्दल सहानुभूती निर्माण करावी येवढ्यासाठीं किरातानें हें वर्तमान तांतडीनें सर्व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करविलें. मात्र त्याचा परिणाम अगदीं उलट झाला. विलास वनिताविश्रामांतून तावातावानें निघाला, तो तडक पोलीस ठाण्यावर गेला. व त्यानें झालेला नकार सांगितला परंतु 'खासगी फिर्याद मॅजिस्ट्रेटकडे मांडा' असा त्याला जबाब मिळाल्यामुळें तो खजील झाला होता. आपणहून फौजदारी फिर्याद करायला तो नाखूष

होता. पण दुसऱ्या दिवशीं सर्व वर्तमानपत्रांतून विलासानें जयपालावर खुनी हल्ला केल्याचें वर्तमान प्रसिद्ध झालें. त्यासरशीं आपलें नांव बद्दू होऊं नये म्हणून त्यानें दुसऱ्या दिवशीं मॅजिस्ट्रेटकडे मारामारी, जीव घेण्याच्या धमकी शिवीगाळी केल्याबद्दलची फिर्याद नोंदविली. जयपालावर फिर्यादीचें सुचनापत्रहि बजावण्यांत आलें. विलास आणि जयपाल ह्या दरेकाची आत्मसमर्थनाची तयारी सुरू झाली.

सदर फिर्यादींत अचलेबद्दलची हकीगत येणें अपरिहार्य होतें. अचलेच्या हकीगतीवरूनच बोलाचाल झाली आणि विलास कांहीं लागण्यासारखें बोलल्यामुळें जयपालानें रागाच्या भरांत विलासाला संस्थेंतून बाहेर काढलें असा जयपालतर्फे बचाव होता. अर्थात् अचलेची हकीगत साध्यंत विलासाच्या तोंडून काढल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. अचलेची कच्ची हकीगत जयपालनें तयार केली. विलासाची क्रूरतेची वागणूक कोर्टात अनायासें बाहेर येईल, लोकांना परित्यक्तेची दुःखें माहित होतील, ह्या प्रश्नाकडे त्यांचे लक्ष जाईल, हाहि उद्देश ही फिर्याद लढविण्यांत होता.

फिर्यादीचें काम सुरू झालें, फिर्यादी विलास ह्यांची उलटतपासणी सुरू झाली तींत त्यांनीं कबूल केलें कीं अचला हिच्याशीं आपलं लग्न झालं होतं. पण ह्या घटकेस मी तिला आपली बायको समजत नाहीं. लग्नानंतर आलेल्या निनांवीं पत्रामुळें कांहीं बेबनाव झाला, त्यामुळें अचलेला माहेरी पाठवून दिली, पुढें तिला पुनः नांदायला आणली. तिच्या बद्दलची निनांवीं पत्रें आलीं होतीं. तिला मी कोंडून ठेवली. तिला मी डागली नाहीं. तिच्या अंगावर डागल्याचे वण कशानें पडले ते मला माहित नाहीं. लग्नाच्यापूर्वी वण नव्हते. तिच्या अवघड जागी डाग दिल्याचें खोटें आहे. ती स्वयंपाक करतांना चुलीवरचें आधण अंगावर आलें, त्यामुळें ती भाजली होती. तिचा त्यावेळीं पोलीसांत जबाब झाला असेल, तिनें जबाबांत काय सांगितलें तें आठवत नाहीं. भाजण्याच्या आदल्या दिवशीं तिनें आपल्या आईला एक चिठ्ठी पाठविली असेल. चिठ्ठींत माझ्या जिवास धोका आहे असें तिनें लिहिलें होतें कीं नाहीं मला माहित नाहीं. तिला कोंडून ठेवली होती, कारण तिला वेड लागलें होतें. ती सैरावैरा पळत असे. घरांतून पळाली तशी ती आईजवळ

राहत होती. तिला मी अन्नवस्त्र देत नाहीं. आणि देणारहि नाहीं. मी तिला आपली बायको समजत नाहीं. ती माझ्या इच्छेविरुद्ध घरांतून निघून गेली. म्हणून मी तिला पोसण्यास बांधलेला नाहीं. ती घरांतून निघून गेली त्यापूर्वी दोन वर्षं माझं उषेबरोबर लग्न झालं होतं आणि उषा घरांत नांदत होती. उषा ही आपल्या बापाची एकुलती एक मुलगी होय. तिच्या बापानं सुमारें लाख एक रुपयांची मिळकत ठेवली, तिचा वारसा उषेला मिळाला. उषेशीं प्रथम प्रेम जमलं आणि नंतर बऱ्याच दिवसांनीं विवाह झाला. मी मोटार एजंट आहे. शिव्हरोलेट कंपनीचा मुंबई इलाखा आणि काठेवाड प्रांतापुरता सोल एजंट आहे. धंद्याला भांडवल उषेनं दिलं आहे. माझं शिक्षण साधारण झालेलं आहे. इंग्रजी लिहितां वाचतां येतं. मी युनिव्हर्सिटीची कुठलीच परीक्षा पास झालों नाहीं. चौथा इयत्तेंतून मी शाळा सोडली, पुढचं शिक्षण मी घरींच केलं. अचला वनिता विश्राममध्यें असल्याचें मला समजल्यावरून मी संस्थेकडे तिला काढून टाकण्याबद्दल तक्रार केली होती. त्याप्रमाणं तिला वसतिगृहांतून तिला शाळेंतून काढून टाकावी असं सांगण्यासाठीं मी गुन्ह्याच्या दिवशीं जयपाल आरोपी यास संस्थेच्या ऑफिसांत भेटलो. अचला बदफैली आहे असं मी त्यांना सांगितलं. जयपालचा आणि अचलेचा वाईट संबंध आहे असा माझा समज आहे. माझी बायको उषा ही शिवणकाम शिकण्यासाठीं संस्थेंत जात असते. तिनं प्रत्यक्ष ह्या दोघांची बोलणीचालणी हांसणीं खिदळणीं पाहिली आहेत. तिनं खात्री करून घेतली आहे. जयपालांवर मी हा आरोप केला. त्या सरशीं तो माझ्या अंगावर धाऊन आला. त्यांनीं मला मारलं नाहीं. मीच ऑफिसांतून बाहेर पडलों. अचलेचा आणि जयपालचा वाईट संबंध असल्या-बद्दलची हकीगत माझी बायको उषा जाणीत आहे. शाळेंतल्या शिवण मास्तरीण-बाई शोभाबाई ह्याहि जाणीत आहेत. बोलाचाली झाली व मी बाहेर पडलो. त्या सर्व काळपर्यंत शोभाबाई ऑफिसांतच होत्या. शोभाबाई शिवाय दुसरं कोणीच तेथं हजर नव्हतं. शाळा सुटून गेली होती, गडी मला दिसले नाहींत. ”

उलट तपास पुरा होतांच मॅजिस्ट्रेटनं विलासांच्या वकिलाना विचारलें.

“ आणखीन पुरावा घेण्याची जरूरी आहे ? फिर्यादी तर मारामारीचं कांहींच सांगत नाहींत. ”

वकील:—आम्ही शोभाबाईची साक्ष दिली आहे. मारामारी झालेली त्यांनीं पाहिली आहे. अन् फिर्यादीची इच्छा असेल तर त्यांच्या कुटुंबास मी साक्षींत यायला सांगणार आहे.

मॅजिस्ट्रेट:—पहिल्या कुटुंबाला का दुसऱ्या कुटुंबाला ?

वकील:—दुसऱ्या कुटुंबाला आम्ही बोलावूं. पहिल्या कुटुंबाला आरोपीनं बोलवावं पाहिजे तर.

आरोपीचे वकील:—फिर्यादीचं संसारचित्र उणं राहत असेल तर पहिल्या कुटुंबाला बोलावूं. बचावाला पुरावा घ्यावा लागला तर अचलाबाईंना आम्ही आणणार आहोत !

मॅजिस्ट्रेट:—आहो पण कशाला ! त्या मारामारीच्यावेळीं हजर होत्या असं फिर्यादी कुठे सांगतात !

आ० वकील:—त्यांच्यामुळेच हे प्रकरण उपस्थित झालं आहे. त्याच्या-संबंधी आरोपीवर फिर्यादीनं केलेले आरोप धादांत खोटे आहेत हें शाबीत करण्यासाठी त्यांना साक्षीमध्ये बोलवूं.

मॅजिस्ट्रेट:—मला दुसरा धंदा नसेल नाहीं ? मी कांही हिथे एकादी सामाजिक कादंबरी नाहीं लिहित. फिर्यादी म्हणत आहेत शोभाबाईंना साक्षीमध्ये आणतो म्हणून. पुढील तारखेला हजर ठेवा. नाहीतर फिर्याद काढून टाकीन. आज हजर होत असतील तर घेऊन टाकूं.

फिर्यादी वकील:—त्यांना रजा घ्यावी लागेल.

आरोपी वकील:— त्यांची साक्ष आहे म्हणून त्या आज रजेवरच आहेत, असं आरोपी सांगतात.

मॅजिस्ट्रेट:—खरंच त्या साक्षींत येणार आहेत का ? तर मी मुदत टाकतों.

फिर्यादी वकील:—एक तारीख टाकावी. त्यांना हजर तरी करा नाहीं तर काम पुरं तरी करा.

फिर्यादीचें त्या दिवसाचें काम तहकूब राहलें.

उलटतपासणींत निघालेल्या हकीगतीची सर्वत्र चर्चा होऊं लागली. तसा विलास अधिकच उसळला. परंतु फिर्यादीत त्याला यश मिळविण्यासाठीं

शोभाबाईच्या जबानीवर सर्व आधार होता. शोभाबाईच्या जबानीबद्दल यापूर्वींच खटपट झाली होती. परंतु शोभाबाई ' बघेन ! खरी हकीगत असेल ती सांगेन, ' येवढेंच सांगून आल्या माणसाला परत पाठवीत. आतां नुसती खरी हकीगत सांगून चालणार नव्हतें, तर निकालाच्या बाजूची हकीगत शोभानें सांगणें जरूर होतें. तेवढ्यासाठीं मोठ्या लगबगीनें उषा शोभाबाईला भेटायला आली,

" माझ्या करतां तरी तुम्ही येवढं सांगितलंच पाहिजे कीं जयपालांनीं ह्यांच्या अंगावर हात टाकला. " उषा म्हणाली.

" खरं असेल तें सांगेन, अमूक सांगेन तमूक सांगेन आतां कांहीं कुणाला शब्द देत नाहीं मी. " शोभानें उत्तर दिलें. उषेचा चेहरा खरकन उतरला.

" म्हणजे असंच तुमच्या मनांत आहे, कीं इकडची बेअब्रू व्हावी ! जयपालांनीं त्यांना मारल्याचं शाबीत नाहीं झालं म्हणजे खोटे कोण पडले ! हेंच कीं नाहीं ? अन् अगोदरच जबानींत बाटेल तसल्या खोट्यानाट्या हकीगती विचारून घेतल्या आहेत जयपालच्या वकीलानें. आणि वर ही फिर्याद खोटी ठरली म्हणजे मग आम्हां दोघांना गांवांत राहायलाच नको. "

" पण तुमची फिर्याद खरी ठरली काय अन् खोटी ठरली काय, मला काय त्याची येवढी इर्षा बाळगण्याचं कारण ? मी थोडीच फिर्याद करायला सांगितली होती ! अन् विलासांची अब्रू जाईल म्हणतां, पण संस्थेच्या अब्रूला मला जपायला नको का !

" मला आशा होती कीं, निदान अचलेसाठीं तरी तुम्ही आमच्यासारखं सांगाल ? "

" अचलेसाठीं म्हणजे ? "

" अचलेवर सूड उगवण्यासाठीं ! पण मी आतां समजले. "

" काय ? "

" कीं जयपालांना बचवायला तुम्ही पाहतां ! मला सगळं दिसतं आहे ! नाहीं असं नका समजूं ! जयपालला बचावण्यासाठीं तुम्हीं त्याच्या बाजूनं साक्ष देणार ? जयपाल जर तुमच्या ताब्यांत असता तर ते ठीक

होतं. अचलेनं केव्हांच त्याला आपल्या मुठींत घेतला आहे. असा तर जयपाल अन् तुम्ही मोरे त्याच्या बाजूची साक्ष देणार !"

"उषाबाई, लोकांच्या भानगडींत मी पडत नाहीं, तसं दुसरीनींही माझ्या भानगडींत पडलेलं मला खपत नाहीं. जयपालांना तुम्ही आज ओळखतां. मी आज वर्षानुवर्ष ओळखते आहे. जयपाल तसे नाहींत, अन् जरी तसे असले तरी मी त्यांच्या विरुद्ध जबानी साफ देणार नाहीं."

"कशाला बाल ! तुम्ही होऊनच राजरोसपणं अचलेचा अन् जयपालाचा संसार मांडून दिला आहे, तर तुम्ही कशानं देणार आहांत आमच्याकडची जबानी ! सगळं गांव काय म्हणतं तें तरी ऐका ! जयपालाचा तुमच्याशीं पुनर्विवाह होणार म्हणून मी ऐकत होतें. आतां लोक चक्क बोलूं लागले आहेत कीं अचलेशींच जयपालांनीं संसार थाटला आहे."

"असं बघा. तुम्हां नवराबायकोंना भरमसाट बोलायची संवयच आहे. पण आम्हाला असं बोलणं ऐकून घेण्याची संवय नाहीं. तुमचे विलास अन् तुम्ही परमेश्वरानं जोडा कसा शोधून जमवला आहे."

"तुमचे जयपाल तसेच आहेत. जयपालांना मी लहानपणापासून ओळखतें आहे !"

"अन् मलाहि तुमची खडान्खडा हकीगत माहिती आहे, समजलांत !"

"जयपालांनीं सांगितलं असेल ! होय खात्रीनं ! त्याच्या शिवाय दुसऱ्या कोणाला माझ्याबद्दल माहिती नाहींच आहे. बरेच आहेत जयपाल ! बसल्याबसल्या दुसऱ्याबद्दल भलत्या सलत्या कंड्या पिकवतात म्हणायच्या ?"

"जयपाल कुणाबद्दल कधींच कांहीं बोलत नाहींत. ते कांहीं विलास नाहींत. अन् तुमच्या हकीगती जयपालांनीं सांगितल्या तरच कळतील असं थोडंच ! सगळ्या जगजाहीर आहेत. अचला बिचारी भोळी ! तिच्या भोळेपणाचा फायदा घेऊन तुम्ही घरांत घुसलांत अन् तिला मात्र बिचारीला देशोधडीला लावलंत. माझ्या सारखी असती तर झिंज्या उपटून बाहेर काढलं असतं तुम्हांला !"

"अचलेला संभाळा ! नाहीं तर झिंज्या पकडून तुम्हालाच ती तुमच्या घरांतून बाहेर घालवून देईल अन् जयपालाला घेऊन राहील."

इतक्यांत किरात आला. उषाचें बोलणें थांबलें. शोभाला तेंच पाहिजे होतें. " थांबा. मी आले " असे म्हणून उषेकडे ढुंकूनहि न पाहतां शोभा निघून गेली. उषा खजील होऊन परत फिरली.

" अचलेची हकीगत ह्या येत्या अंकांत छापणार आहे, तेवढ्यासाठीं मी आलो होतो. " किरात म्हणाला.

" तुम्ही पुढं व्हा. घरी जा. मी येतेच. अचला घरी आहेच. तिला विचारा हकीगत, मी येतेंच. " असें म्हणून शोभा जयपालाला भेटण्यासाठीं ऑफिसांत गेली. किरात उषेच्या मागोमाग बाहेर पडला.

जयपाल टेबलाजवळ कांहीं तरी लिहीत बसला होता. त्यानें शोभाकडे पाहिलेंही नाहीं. कदाचित आपण आल्याचें समजलें नसेल म्हणून जयपालनें पाहिलें नसावें असें वाटून शोभा म्हणाली.

" जयपाल ! आतां उषा आली होती. विलासाची बायको उषा आली होती. "

जयपालानें वरती न पाहतांच उत्तर केलें, " होय मी तिला येतांना पाहिलं होतं. "

आपण जयपालासाठीं किती भांडलों हें शोभाला त्याला सांगावयाचे होतें. पण जयपालच्या बेफिकीर वर्तनानें तिच्या सर्व दुरुपायांवर पाणी पडलें.

" आली होती सांगायला, कीं आमच्या बाजूची साक्ष द्या म्हणून. " शोभा म्हणाली.

" त्यासाठींच आली असेल असं मी ताडलं होतंच. "

" मी सांगितलं, मी हकीगत जी घडली, ती सांगेन. मग कुणाला लाभ होवो कीं हानी होवो. "

" असंच उत्तर द्यायला हवं, नाहीं का ? "

" पण मनांत ठरवलं आहे की जर करतां साक्षीला मला उभीच केली तर सांगणार आहे कीं, "

" काय ? "

" कीं विलासांनींच जयपालांना शिव्या द्यायला सुरवात केली आणि

विलासच जयपालाच्या अंगावर धाऊन गेले. त्याचेच दांत त्याच्या घशांत घातले पाहिजेत. ''

'' छे: ! छे: ! ! ही खरी हकीगत नाहीं होणार ! आणि खोटं का बोलणार तुम्ही ? कशासाठीं खोटं बोलतां ? ''

'' तुम्हांला बचावण्यासाठी. ''

'' ह: ! सत्य माझी पाठराखण करील. अन् आतां माझ्या डोक्यांत एकच विचार सारखा घोळत आहे कीं लोक म्हणत असतील ! कीं हा सत्याग्रही अन्–''

'' अन् अचलेच्या नादाला कुठं लागला ! असंच ना ! ! बोलू नये पण लोकांच्या दृष्टीनं हे केव्हांहि गौण दिसणारच ! ''

'' अचलेबद्दल नाही कांही वाटत. पण लोक म्हणतील ह्यानं वकील काय दिलान् अन् साक्षिपुरावे काय गोळा करतो आहे ? ''

शोभा पुन: खजील झाली व म्हणाली.

'' पण दुसऱ्यांनीं खोटी फिर्याद केली तर बचावसुद्धां का नाहीं करायचा ? ''

'' पुढल्या तारखेला मीच होऊन कबूल करणार आहे, की मी विलासाचा गळा पकडला होता आणि तो जर पळून गेला नसता तर रागाच्या भरांत मी त्याला वेळीं ठारहि मारलं असतं. खरी हकीगत अशीच आहे. ''

'' वा : ! चांगलाच विचार आहे ? अन् तुम्ही तुरुंगांत गेलांत म्हणजे मागं कसं होणार ? ''

'' कुणाचं ? ''

'' कुणाचं म्हणजे ? माझं ! '' मधें आवंडा गिळून शोभा म्हणाली, '' अन् अचलेचं ? ''

'' तुमच्या तुम्ही दोघी समर्थ आहांत, स्वत:चं रक्षण करायला. ''

'' काय होणार आहे ? संस्थेच्या कार्यकारी मंडळानं काल ठरविलं आहे, कीं माझ्या हातांतून व्यवस्था काढून घ्यावी. हें आत्तांच माझ्या हातीं त्यांचं लिखाण आलं. त्याचं उत्तर लिहित होतों. ''

'' असं ? मग मलाहि संस्था सोडावी लागणार म्हणायची '' !

" तें कां म्हणून ? "

" तुम्ही हिथून गेल्यावर संस्थेंत कोण राहतो ! "

" शोभाबाई ! आमच्यासारख्यांच्या नादावर दुसऱ्यांनीं राहूं नये. अहो मुळी बोलून चालून आम्ही चुकलेलीं गुरं, कुठल्या तरी संस्थेच्या कोंडवाड्यांत येऊन पडायचीं. तिथून कुठंतरी निघून जावयाची. आमच्या नाहीं पोटीं ना पाठी ! कुणी नाहीं मागं रडायला ! मुकाणूं तुटलेलं तारूं बोलून चालून आमचं ! तरंगेल तोंवर तरंगेल, अन् खडकावर आपटलं तरी पाहिजेच आहे. जीवनयात्रा लवकर संपेल. "

शोभा गहिंवरली, तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. थोड्या वेळानें घोगऱ्या आवाजांत ती म्हणाली. " मग खरंच का तुम्ही संस्था सोडणार ? "

" म्हणजे थट्टा का वाटते तुम्हाला ? ह्या संस्थेला माझे पाय आज शेवटचेच लागले. उद्यांपासून मी उंबरठाहि ओलांडणार नाहीं. संस्थेचं हित मला पाह्यलं पाहिजे. संस्थेच्या दृष्टीनं झालं हें प्रकरण बरोबर झालं नाहीं. गवगवा झाल्यानं संस्थेला कमीपणा आलाहि आहे. माझी चूक मीच सुधरायला पाहिजे होती. अध्यक्षांनीं ती सुधारली योग्यच केलं. "

इकडे किरात शोभेच्या घरीं गेला होता. अचलेनें त्याला पाहिलें आणि ती आंतल्या खोलींत बसून राहिली. शेवटीं किरातानेंच म्हटलें,

" अचला ! मी तुमची हकीगत पाक्षिकांतून छापणार आहे. "

" येवढी वर्तमानपत्रांतून हकीगत आल्यावर आणखीन ती काय पुनः छापायची जरूरी ! "

" मी सगळी खरी हकीगत छापणार आहे. "

" मर्जीस येईल तसं करा. "

" मग मला सांगतां का सगळीं हकीगत ? "

" तुम्हांला खडानखडा माहित आहे, ती सत्य हकीगत मात्र छापा येवढंच माझं म्हणणं आहे. "

" आणि अजूनहि तुम्हाला वाटतं ना कीं सत्य हकीगत बाहेर येत नाहीं म्हणून. "

" मी सांगतें ना ! परमेश्वराला डोळे आहेत. आपण माणसांनीं छपवा-

छपवी केली तरी आपण माणसामाणसांना फसवूं फार झालं तर! पण परमेश्वराला कसं फसविणार ? ”

“ असं ? बरं. ”

“ मी काय जास्त बोलणार ! सर्व बाजूंनीं मी संकटांत सांपडलें आहे. खरं म्हटलं तर माझ्यासारखीनं तोंडांतून ब्रसुद्धां काढूं नये. सगळं निमूटपणं गिळून जावं. पण जीव तडफडतो, तोंडावाटे शब्द निघून जातात. ”

“ साप म्हणून तुम्ही भुई धोपटतां आहां ? ”

“ आणि मला मातीला मिळविलीत तर मी भुईलाच आतां धोपटणार ! ”

किरात कांहीं न बोलता निघून गेला.

शोभा अगदी खिन्न होऊन घरी आली होती. किराताला अशावेळीं भेटण्याचें तिच्या मनांत नव्हतें. किरात नसल्याचें वाटून तिला बरेंच वाटलें.

अचलेकडे तिनें पाहिलें तों तिचा चेहरा लहान झालेला दिसला, डोळयां-तले अश्रू नुकतेच पुसलेले आढळले.

‘ खात्रीनें हिला जयपालानीं संस्था सोडल्याचं आपल्या आधीं कळविलें तर अन् मी केवढी मूर्ख, की जयपालची आशा मी अजून मनांत धरतें’ असें शोभेच्या मनांत आलें आणि पलंगावर अंग टाकून ती भिंतीकडें तोंड करून अश्रू गाळीत पडली.

“ चहा करूं का ! डोकं का दुखतं आहे ? ” असें जवळ येऊन अचलेने नम्रपणें विचारलें.

“ मला स्वस्थ पडूंसुद्धां का नाहीं देत ? ” आर्त स्वरांत येवढेंच एक वाक्य शोभा बोलली, जास्तच रडूं लागली.

आणि खजील झालेली अचला आंतल्या घरांत जाऊन कोपऱ्यांत रडत बसली.



विलासाची फिर्याद पुराव्याच्या अभावीं काढून टाकण्यांत आली. शोभाची साक्ष झाली नाहीं. मॅजिस्ट्रेटनें ठरावांत विलासाबद्दल बरीच विरुद्ध टीका केली होती आणि वनिता-विश्राम संस्थेची प्रसंशा केली होती. परित्यक्तांना आश्रय देणाऱ्या संस्थेबद्दल दुष्ट नवऱ्यांना स्वाभाविकच वैषम्य वाटत असल्यामुळें केवळ माणसांचा सूड संस्थेवर घेण्यासाठीं विलासने ही खोटी फिर्याद दाखल केली आहे असेंही विधान केलें होतें. शिवाय खोटी आणि त्रासदायक फौजदारी फिर्याद करून जयपालसारखा प्रतिष्ठित गृहस्थाला विनाकारण त्रास दिला आणि संस्थेच्या कामांत व्यत्यय आणला. यासाठीं विलासाकडून दोनशे रुपये जयपालास नुकसानी दाखल देण्याचा हुकूम मॅजिस्ट्रेटनें केला. परंतु यापूर्वींच व्यवस्थापकांनीं तांतडीची सभा बोलावून जयपालचें वर्तन संस्थेच्या हिताला, नांवाला आणि कार्याला विघातक आहे असें ठरवून त्याच्या हातांतून चिटणीसाचें काम काढून घेण्याचा ठराव केला आणि तो ठराव मिळतांच जयपालनें आपल्या जागेचीताबेदारी दुसऱ्यास सोंपवून दिली. विलासाकडून आलेली नुकसानीची रक्कमहि स्वतः न घेतां त्यानें संस्थेला दिली. मॅजिस्ट्रेटने अनुकूल ठराव केला. लोकांची सहानुभूती जयपाल ह्यांचेकडे जास्त झुकली आणि जयपालासारख्या कळकळीनें कार्य करणाऱ्याला केवळ विलासाच्या सांगण्यावरून कामावरून दूर केलें ह्याबद्दल संस्थेच्या चालकांना लोक दोष देऊं लागले.

जयपालानें संस्था सोडतांच अचलेची बाजू घेणारें संस्थेंत कुणींच राहिलें नाहीं. तिच्यामुळें संस्थेस कमीपणा आला, जयपालासारख्यांनाहि तिनें बिघडविलें आणि संस्थेस पारखे केलें हा तिच्यावरचा प्रवाद कायम राहिला, इतकेंच नव्हे तर तो आणखीन् दिवसेंदिवस वाढतहि गेला. तिला सर्व शिक्षकवर्गाकडून त्रास होऊं लागला, तरी तिनें तो निमूटपणें सहन केला.

अचला मात्र बदनामी व छळ हीं निमूटपणानें सहन करीत होती. पण विलासाला बदनामी सहन झाली नाहीं. विलासाच्या फिर्यादींत विलासाचें हिडीस मन, क्रूर वर्तन, सभ्यतेचें ढोंग, आणि कुरूप संसारचित्र ह्यांचा बाजारच जणू उघडा झाला होता. मॅजिस्ट्रेटनें दिलेला निकाल वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाला. विलास हा पुष्कळ दिवस सार्वजनिक चर्चेचा विषय होऊन राहिला. त्यामुळें बाहेर तोंड काढण्याची चोरी झाली. त्याचा राग अनिवार झाला आणि स्फोट होण्याची तो वाट पाहत होता. अचला रोज वनिता–विश्राम शाळेंत जात येत असे आणि ही गोष्टहि त्याला खपेनाशी झाली. अचलेला शाळेंतून काढून टाकण्याबद्दल वनिताविश्रामच्या संस्थेच्या अध्यक्षाकडून पुनः त्यानें प्रयत्न केला. पण कर्मधर्मसंयोगानें त्याच्या अगोदरच रावबहादूरांची आणि निकाल देणाऱ्या मॅजिस्ट्रेटची गांठ पडली होती. त्यानें संस्थेची आणि जयपालाची प्रसंशा करून विलासाची यथेच्छ निर्भत्सना केली होती. आणि मॅजिस्ट्रेटजवळ रावबहादूर बोलूनही गेले होते कीं विलासाचे यापुढें संस्थेत येणेंजाणेंही बंद करून टाकण्यांत येईल. ही मुलाखत ताजी असतांनाच विलासानें अचलेला शाळेंतून काढून टाकण्याबद्दल बोलणें काढलें आणि रावबहादूरांचा नकार त्याला घ्यावा लागला. त्यामुळें विलास अचलेवर अधिकच संतापला.

अचला एक दिवस सकाळीं एकदां ११ वाजण्याच्या सुमारास शाळेकडे जात होती. शाळेच्या समोर ती येते तों समोरून विलासची मोटार येऊन थडकली. त्यांत विलास, ड्रायव्हर आणि उषा एवढी मंडळी बसली होती. अचलेला पाहतांच विलास एकदम जागेवर उसळला आणि ओरडला, "ती पाहा. गाडी तिच्याजवळ उभी कर. मीच तिचा समाचार घेतो." शोफरनें अचलेच्या जवळ येतांच गाडी उभी केली. विलास हातांत टेनिस बॅट घेऊन बाहेर पडला आणि "×× माझी बेअब्रू चालवली काय? कशी रस्त्यातून परत

मिरवतेस तें पाहतों, " असे म्हणून त्यानें अचलेला हातांतील रॅकेटनें झोडण्यास सुरवात केली, अचला मदतीकरितां सभोंवार पाहात राहिली. येणारा जाणाऱ्यांचा भोंवती घोळका जमा झाला. दोन गृहस्थ पुढें आले आणि पाठोपाठ एक पोलीस शिपाईहि पण आला.

" पकडा या गुलामाला " एकजण म्हणाला. पोलीस पुढें होऊन त्यानें विलासाचा हात धरला आणि म्हटले, " थांबा. तुमचे नांव द्या. "

" जमादार बाजूला व्हा. ही माझी बायको आहे, " विलास म्हणाला. " ही माझ्या इच्छेविरुद्ध घराच्या बाहेर भटकते. हिला मी मारणार आणि तुम्हांला मध्यें पडण्याचें कारण नाहीं. "

" साहेब, हा रस्ता आहे. रस्त्यांत रहदारीला अडथळा होण्यासारखं कांहीं करूं नका आणि बाई तुम्ही आपल्या घरीं जा. " असें म्हणून शिपाई निघून गेला.

" कुठं जातेस ? आतां मला घरी जाण्याची घाई आहे म्हणून गय केली. पुनः दिसू दे तर तोंड !" असें म्हणत म्हणत विलास मोटारींत परत येऊन बसला.

मोटार निघून गेली. अचला लोकांच्या घोळक्यांतून जाण्याला वाट न मिळाल्यामुळें वेड्यासारखी मध्यें उभी राहीली.

" बरी खोड जिरवली !"

" घरोघर असले खंबीर नवरे निघाले पाहिजेत. "

" म्हणजे चट बायका वठणींवर येतील "

" पण नवरा झाला म्हणून काय झालं ! त्याला आपल्या बायकोला मारण्याचा हक्क आहे का ?"

" अहो हक्क असेल म्हणूनच शिपाई तसा निघून गेला ना ? "

" आणि ही बाई कसल्या वर्तनाची आहे ? कशाबद्दल तिला नवऱ्यानं मारलं ? हे तरी आपल्याला कुठं काय माहित आहे ? आपल्याला तेवढं मारलेलं दिसतं. पण या बाईचं वर्तन आपल्याला दिसत नाहीं.

" अय्या ! या बाईला किनई हिच्या नवऱ्यानं मारलं. "

"हिनं उगीच ऐकून घेतलं. माझ्यासारखीनं तर पायांतली चप्पल काढू-नच नवऱ्याचं टाळकं सडकलं असतं,"

"पाह्यलंत ! कलियुग आहे कलियुग ! असा प्रकार आणि रस्त्यावर कधी पाहिला नव्हता. नवराबायको आहेत, भांडण, मारझोड घरोघर व्हाय-चीच, पण ही पहा सुधारणा."

"अहो जुने लोक अंधारकोठडींत कोंडून बायकोला मारीत तर आतां टिच्चून भर चौकांत बायकोला नवरा झोडपतो, ही सुधारणा नाहीं का?"

सभोंवार जमलेल्या लोकांतून अशा संवादांची देवघेव चालली होती. जास्त तमाशा पाहायला मिळत नाहीं म्हणून निराश झालेलीं शाळेतील मुलें "हुर्यो ! नवऱ्याची हुर्यो ! !" अशा आरोळया मारून धांवत सुटली. लोकांची पांगापांग झाली. अचला खालच्या मानेनें शाळेच्या दरवाज्याकडे चालूं लागली. झालेल्या फजीतीपुढें, ऐकलेल्या दुरुत्तरांपुढें आणि बहुजन समाजाच्या बेफि-किरीपुढें झालेल्या माराचें दुःख तिला कांहींच वाटलें नाहीं. शाळेच्या दर-वाज्याशींच शोभाबाई तिला भेटली. शोभाबाईच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता. पण आपली सहानुभूति मुद्दामच दाखविण्यासाठीं ती अचलेला म्हणाली,

"अचलाबाई ! मी केव्हाची दारांत येऊन उभी आहे कीं तुम्हीं पळून शाळेंत याल म्हणून ? म्हणजे इतका हा प्रकार झाला नसता."

"शाळा माझं थोडंच रक्षण करणार आहे ! आणि आजवर कुणाचं रक्षण होतं ? अहो आमच्या सारख्यांचा पाठीराखा परमेश्वर." अचलेनें डोळयांतील अश्रू पदरानें टिपतांना म्हटलें.

"पण जयपाल असते तर धांवून आले असते नाहीं ?"

"कुणाला ठाऊक ? अन् जयपाल नव्हते तें एका अर्थी बरं झालं"

"कां ?"

"ते धांवून आले असते. मोठी मारामारी झाली असती आणि कोणाला तरी जबर दुखापती झाल्या असत्या."

"मग त्यांत काय आहे ?"

"माझ्यासाठीं मारामाऱ्या हें मला कसं पाहवेल ? माझे मी छळ सोसा-यला तयार आहे." इतकें बोलून अचला आपल्या वर्गाकडे निघून गेली.

अचलेची होत असलेली विटंबना शोभा पाहात होती. शाळेंतील गडी अचलेला सोडवण्यासाठीं पुढें सरसावले. पण शोभेनेंच त्यांना, "आपल्याला काय करावयाचें आहे कोणाच्या भानगडींत पडून ? तुम्ही जाऊं नका." असें सांगून परतविलें होतें. तिला आनंदाच्या आंतून उकळया फुटत होत्या. अचलेच्या तोंडून जयपालाबद्दल कांहींच विशेष निघालें नव्हतें, या गोष्टीनेंही तिला थोडेंसें समाधानच वाटलें.

दुपारीं नित्याप्रमाणें उषा शिकण्यासाठीं म्हणून शाळेंत आली. तिनें शोभाबाईला एकीकडे बोलावून घेतलें आणि म्हटलें, "मला कांहीं तुमच्याशीं बोलायचं आहे,

"सकाळच्या प्रकाराबद्दल होय ? पण मी म्हणते रस्त्यांत ही अशी मारामारी करणं बरोबर दिसत नाहीं."

"हिला तरी आमची बेअब्रु करण्यासाठीं मुद्दाम येथें राहून रोज शाळेंत जाणं येणं शोभतं कां ? सगळे लोक आम्हांलाच नावं ठेवतात, पण म्हणतात ना, पुरुषांचं करणं दिसतं, बायकांचं वागणं दिसत नाहीं.

"मग तिनं करावं तरी काय ?"

"काय करावं म्हणजे! हें गांव सोडून वाटेल तिकडे मसणांतसुद्धां जावं. एकदां समजलं, कीं आपल्या पुरुषांना अमुक एक करणं आवडत नाहीं, मग बायकांनीं तरी एवढा हट्ट काय म्हणून धरायचा ?"

"अहो, पण ही घरांत नांदणाऱ्या बायकोची गोष्ट झाली. जिला नवरा नांदवीत नाही तिनंसुद्धां नवऱ्याला काय म्हणून भ्यायचं ?"

"नवऱ्याला नाहीं भ्यायचं तर मग खावा मार! अन् नवऱ्याला भ्यावं असं कोण म्हणतं ? पण त्याच्या अब्रुला तरी बायकोनं जपलं पाहिजे ना ?"

"नवरा आपण होऊनच कोर्ट कचेऱ्यांत जाऊन आपल्या अब्रुचे धिंडवडे मांडू लागला तर त्यांत त्याच्या बायकोचा काय दोष ?"

"कां नाहीं दोष! तिच्यामुळंच ना आम्हाला खाली पाहणं येतं ना ? हिनं जर दुसरीकडे कुठं काळं केलं असतं, तर हा एवढा मारमारीचा आणि

फिर्यादीचा बखेडा होण्याचं कांहीं कारण होतं ? पण लोक मुळीं खरं कारण पाहतच्च नाहींत. अन् जो तो आमचाच्च दोप काढतो."

"विलासाचा दोप तर खराच. संस्थेंत येऊन जयपालांना अद्वातद्वा बोलणं हे कांहीं शोभलं नाहीं."

"तुम्ही होय म्हणा, नाहीं म्हणा, पण जाणताच आहांत, कीं जयपालानें इकडच्या अंगावर हात टाकला हें तरी जयपालानं चांगलंच केलं असेल नाहीं ?

"मला नाहीं बाई, त्यातलं कांहीं समजत."

"कशाला समजेल ! आपल्या पायाशीं आलं म्हणजे असेच कानावर हात ठेवावे लागतात. जयपाळाचा तुमचा नुसता स्नेह तर तुम्हीं एवढी बाजू उचलून धरतां. आणि मी ह्यांची चांगली लग्नाची बायको आहे. मला कांहींच का ह्यांच्याबद्दल वाटत नसेल ? आज आठन् आठ दिवस बिलकूल चैन नाहीं इकडे. सारखे भ्रमिष्टासारखे होऊन घरांतल्या घरांत खेपा घालीत असतात. बाहेर जायला यायला तोंडच राहयलं नाहीं. हा सगळा छळ निमुट-पणानं सहन करावा लागतो. माझा जीव घाबरून गेला आहे, कीं डोकं वगैरे फिरलं तर ! पण तिला कांहीं आहे का ? आणि बोलत नाहीं, बोलणार होते तें. तुम्ही म्हणाल ही बाई जास्त बोलते म्हणून."

"बोलण्याचं काय बाकी ठेवलं आहे ? पण माझा संबंध काय ?"

"संबंध कां नाहीं ? जयपाल अचलेची कड घेऊन आमच्या विरुद्ध बोलतो आणि जयपालाला बरं वाटतं म्हणून तुम्हीं तसंच आमच्याशीं वागतां."

"मी काय वागते बाई ?"

"तुम्हीच तिला थारा दिलात म्हणून तर आमच्या नाकावर टिच्चून ती इथं राहिली आहे. तुम्ही तिला घालवून दिलीत तर कोणीसुद्धां तिला दारांत उभं करणार नाहीं.

"म्हणजे मी अचलेला घरांतून घालवून द्यावं असं का तुमचं म्हणणं आहे ?"

"होय. आमचं दोघाचं, नाहीं इकडचं खास सांगणं आहे. आणि तो निरोप सांगायलाच मी आले आहे."

"पण माझा संबंध काय ? हे बघा तुम्हीं मला आपल्या भानगडींत ओढूं नका."

"आमच्या भानगडी सोडल्या तरी तुमचा तुम्ही कांहीं विचार कराल कीं नाहीं ?"

"माझा विचार ?"

"होय; स्पष्टच बोलतें. अचला आल्यापासून जयपालाबद्दलचे सगळे सगळे तुमचे बेत ढांसळले. आणि अशा बाईला तुम्ही खुशाल आपल्या घरीं ठेवतां ?"

शोभा कांहीं बोलली नाहीं. तिनें आपले दोन्ही ओंठ दातांत घट्ट आंवळून धरले आणि हिरमुसली होऊन, जमिनीकडे दृष्टी लावून ती उभी राहिली. उषेचा एकेक शब्द ऐकत असतां तिच्या डोळयापुढून गेल्या कांहीं महिन्यांचा स्वतःचा चरित्रपट झरझर निघून जात होता. निराशेची हुरहुर तिच्या हृदयांत वाढूं लागली आणि पश्चातापाचा दीर्घ निःश्वास तिनें सोडला.

उषा, शोभेकडे बारकाईनें पाहत होती आणि थोडी थांबून पुढें म्हणाली, "आसरा देणाऱ्याला सुद्धां जी नडली, ती आम्हाला किती नडली असेल, याचा विचार करा."

शोभेनें तिचे ते शब्द ऐकले नव्हते. ती विचारांच्या तंद्रींतून या शब्दाच्या आवाजानें एकदम खडबडून जागी झाली आणि म्हणाली, "काय म्हणालांत ?"

"कर्म ! कर्म माझं ! ! माझ्या मुखावर तर हिनं बिब्बा घातलाच. पण कांहीं कारण नसतांना तुमची आणि जयपालाची हिनं ताटातुट केली. तरी अजून तुमचे डोळे उघडत नाहींत ? पण तुम्हाला डोळे असतील तर दिसेल ना ?"

"काय ? मला दिसत नाहीं ?"

"मुळींच दिसत नाहीं. धडधडीत अचला तुमच्या जयपालशीं संसार करते आहे, तरी तुम्हाला काय करायचं आहे म्हणा ! इकडे कांहीं सरकार-दरबार करणार आहेत. पण मीच म्हटलं शोभाबाईंना पहिल्यानं सांगून पाहातें. नाहीतर ज्याची ती भोगील फळं."

इतकें बोलून उषा तेथून तणतणत निघून गेली. शोभेनें तिच्याकडे पाहिलेंही नाहीं. खरें म्हटलें तर उषेकडे पाहण्याचें तिला धैर्य झालें नाहीं.

संध्याकाळीं शोभा घरीं आली. पाठोपाठ अचलाही आली. चहापाणी

झाल्यावर शोभा किराताकडे जाण्यास निघाली. इतक्यांत एक मवाल्यासारखा दिसणारा इसम शोभेच्या घरीं आला आणि म्हणाला, ' शोभाबाई तुम्हीच ना ? अचलाबाई तुमच्याकडेच राहतात ना ? "

" होय; कां ? "

" मला त्यांना भेटायचं आहे. " असें म्हणून त्या इसमानें खिशांतून एक पाकीट बाहेर काढलें आणि शोभाबाईच्या हातीं ते देऊन म्हटलें, " तें आपल्याजवळ राहूं द्या. मी जेवण झाल्यावर रात्रीं पुनः येईन. "

शोभा त्याच्याकडे पाहत राहिली. तिच्या डोक्यांत तेवढ्या त्या क्षणांत अनेक विचार आले. पण तिला सगळ्यांत आश्चर्य वाटलें असेल तर ह्याचेंच कीं तो इसम उत्तराची वाट न पाहतां झटकन निघून गेला.

पाकीट उघडून पाहतांच आंत एक दहा रुपयांची नोट होती हें पाहून तर शोभाबाईच्या आश्चर्याला पारावारच राहिली नाहीं.

---



" शोभाबाई बसा ना ! अशा कुठल्या मोठ्या घाईत आहांत ? " किरातानें शोभेला विचारलें.

" मला किनई आतां बसायला वेळ नाहीं. मी आज एका बाबतींत तुमच्याशीं शहानिशा करायला आले आहे. तुम्हांला वेळ आहे कां ? " शोभा म्हणाली.

" हो, हो, मला वाटेल तेवढा वेळ आहे. आपण पाहिजे तर ऑफीसच्या आंतल्या खोलींत बसूं. " असें म्हणून किरात जागेवरून उठून आंतल्या खोलींत आला. पाठोपाठ शोभा आली आणि तिनें मधले दार आपण होऊनच लावून घेतलें. किरात जवळच्या एका खोक्यावर बसला आणि शोभा कॉटवर जाऊन बसली.

" हं बोला काय काम आहे तें ? " किरातानें विचारलें.

" मला एका गोष्टीचा उलगडा करून घ्यावयाचा आहे. आज शाळे-समोर विलासानें अचलेला भर रस्त्यांत झोडपून काढलं अन् पाठोपाठ त्याची बायको आली होती. आणि ती म्हणते, ' तुम्हीं आपल्या येथें अचलेला कशाला ठेवून घेतां ? ' या अचलेला जयपालांच्या सांगण्यावरून मी आपल्या येथें राहून दिलं अन् माझ्या जिवाला उगीचच्या उगीचच त्रास झाला आहे. "

" पण तुम्हीं तरी जयपालाचें ऐकतां कशाला ! विलासाला तुम्हीं वाईट म्हणा पाहिजे तर, कारण तुमची त्याची ओळख नाहीं म्हणून. पण मला तो

नुकताच भेटला होता अन् तुम्हांला अचलेची पूर्वपीठिका माहित नाहीं म्हणून. ज्याला तिची पूर्वपीठिका माहीत आहे, त्याला तिच्याबद्दल यत्किंचित्हि कीव यायची नाहीं. ”

“ अस्सं ! तुम्हांला तरी माहिती आहे ना पूर्वीची हकीकत ! ”

“ माझ्या आयुष्याची तिनं स्मशानभूमि केली. माझ्या मनासारख्या गोष्टी झाल्या असत्या, तसं नव्हे, पण ती आपल्या बोलल्याप्रमाणं वागली असती, तर मी आज शिकून मोठ्या हुद्द्यावर चढलों असतों. पण आईबापांनीं विलासाचा पैसा पाहिला आणि हिनं ऐनवेळेला मी आईबापांच्या विरुद्ध वागणार नाहीं असं सांगितलं अन् विलासाशीं लग्न केलं. मी शाळा सोडली अन् ह्या अशा भलत्या मार्गाला लागलों आहे.

“ खरंच कां ? मी नवीनच ऐकतें आहे ? ”

“ आजपर्यंत सांगण्याची वेळच आली नाहीं. शोभाबाई स्पष्ट बोलतों, जयपालाचं तुमचं काय ठरलं आहे ? ”

“ कशाबद्दल ? ”

“ हें पहा, मी काय विचारतों आहे, तें तुम्हां समजलां आहांत. ”

“ कांहींसुद्धां ठरलं नाहीं. लोकांना उगीच भ्रम आहे. मी ‘ विधवाविवाह मंडळां’त जाते येते, जयपालाकडे संस्थेचे चिटणीस अधून मधून येतात जातात म्हणून लोकांनीं आपलं वाटेल ते उठवलं आहे. चिटणिसांच्याजवळ जयपाल म्हणाले होते. कीं केलाच तर पुनर्विवाह करीन. आम्ही दोघं ‘ वनिता-विश्राम ’ संस्थेंत काम करीत होतो. ते माझ्याकडे येत जात होते. एवढाच काय तो आमचा संबंध. मला लोकांनीं म्हटलं होतं कीं, तूं काय ते नक्की विचारून घे. पण आज विचारीन उद्यां विचारीन, अशांत अचलाच येऊन मध्यें उभी राहिली.

“ अजूनही तुम्हाला जयपाळाबद्दल आशा वाटत आहे ना ? ”

“ मग काय करूं ? अचला कशी असली तरी जयपाळ तसे नाहींत. आणि मला तरी दुसरा काय मार्ग आहे ? मला तरी दुसऱ्या कुणाबद्दल आशा वाटणार ? ”

“ कां बरं ? ”

"तुम्हीच बघा. तुमचा तरी ठाम असा कुठें विचार आहे? माझं मासिक चालेल, पैसा मला मिळेल अन् पुढें आपण लग्नाचा विचार ठरवूं, अशी तुमची बोलण्याची रीत! तर मी तरी काय समजावं?"

"पण समजा, आज आपण पुढचा विचार करायला बसलों तर?"

"पण आज नको. मला, कीं नाहीं, आज सकाळपासून कांहीं सुचत नाहीं. अचलेनें सारखा माझा पिछा पुरवला आहे."

"जयपालाचा नाद सोडून द्या आणि अचलेला घरांतून जायला सांगा म्हणजे तिच्या त्रासातून सुटाल.?"

"आतांच तुम्हीं म्हणालात ना! कीं तुमचं अन् अचलेचं लग्नाचं ठरलं होतं म्हणून? तुमचं ऐकमेकावर प्रेम होतं ना एके काळीं?"

"होय. पण त्याचं आतां काय?"

"मी विचार करीन! आगींतून निघून फुपाट्यांत कशाला पडूं? अचलेला घरांतून घालवून देऊं तुम्ही म्हणता. समजा ती होऊन तुमच्याकडे राहायलां आली तर तुम्हीं ठेवून घ्याल कां?"

"तिच्या वडीलांच्या अन्नावर मी वाढलेला आहे. तिला मला नाहीं म्हणतां यावयाचं नाहीं."

"मग प्रश्नच संपला म्हणावयाचा! बरं मी जाते."

असें म्हणून शोभा जाण्यास निघाली. किरातानें दोन्हीं हात पसरून तिची वाट अडविली आणि म्हटलें, "शोभा, अशी डोक्यांत राख घालूं नकोस. माझं तुझ्यावर खरं खरं..."

"किरात, दूर व्हा. मला जाऊं द्या. असंच पुरुष बोलतात अन् बायकांना फशी पाडतात. मला जाऊं द्यां. माझी वाट सोडा. नाहीं तर मी आतां ओरडेन आं!"

"मला आज झिडकारताहा, पण अशी एक वेळ येईल, कीं माझ्या पाया पडत याल. जा, जा, खुशाल निघून जा."

किरात आपणहून बाजूस सरला, शोभा तेथून निघून गेली.

शोभा मनांत जो हेतू धरून किराताला भेटायला आली होती, तो

मुळींच साध्य न होतां ती परत फिरली, आणि आतां तर तिच्या मनांत एक नवीनच धास्ती वाटूं लागली. किराताशीं आज ती पुनर्विवाहाचें नक्की ठरवून टाकणार होती. जयपाल आणि किरात ह्या दोघांत तिची पसंती जरी जयपाला-बद्दल निश्चित होती तरी अचलेच्या प्रकरणामुळें ती आतां डळमळून गेली होती म्हणून तिनें आपल्या मनानें किराताचीच मागणी कबूल करण्याचें ठरविलें होतें. किराताच्या मनांत जयपालाबद्दल हेवा वाटत असे, हें ती जाणून होती आणि त्या मत्सराला आज यथास्थित पेटवून किराताकडून स्वतःचा कार्यभाग ती साधून घेणार होती. दुसऱ्या कोणत्याहि हेतूमुळें नसलें तरी केवळ जयपाला-वर सूड उगविण्यासाठीं तरी किरात आपल्याशीं लग्न करण्यास तयार होईल आणि आपणही केवळ जयपालाच्या अप्रामाणिकपणावर सूड घेण्यासाठीं किराताशीं पुनर्विवाह करण्याचें ठरवून टाकूं, अशा हेतूनें ती आज किरातला भेटायला आली होती. पण अचलेची व किराताची एकमेकाशीं ओळख होती, प्रेम होतें, आणि लग्नाचेंही ठरलें होतें ही गोष्ट कळतांच तिचें डोकें भणाणून गेलें. जयपाल आपल्या हातांतून ज्या कारणामुळें निसटला त्याच कारणामुळें किरातही लग्नानंतर निसटून जाईल, या भितीनेंच विशेषेंकरून किरातानीं आपण होऊन केलेली विनंती तिनें अमान्य केली. संतापा–संतापानें ती घरीं आली. रस्त्यानें येतांना ती विचार करीत होती, कीं अचलेचा कांटा कसा काढावा. अचलेला कोणीकडून तरी आपल्या घरांतून घालवून द्यावी म्हटले, तर ती किराताच्या येथें तरी जाईल, नाहींतर जयपाल तिला कुठेंतरी घेऊन निघून जातील, अशी भीति तिला वाटूं लागली. अलीकडे जयपालानें " वनिता विश्राम " संस्था सोडल्यापासून कुठेंतरी परगावीं जाण्याची भाषा सुरु केली होती त्यामुळें तर तिची भीती जास्तच दृढ होऊं लागली.

घराशीं येऊन पोहोंचते तो दाराशीं दोन तीन शिपाई, चार पांच लोक आणि कोणीतरी पोलीस अमलदार इतकेजण उभे असलेले दिसले. शोभा बुचकळयांत पडली. ती थोडी थबकली. तितक्यांत एक पोलीस शिपाई तिच्याजवळ आला आणि त्यानें तिला विचारीलें, " शोभाबाई मास्तरीण तुम्हीच ना ? "

" होय, कां ? "

" कुंटणखाना ठेवून अनितीचा व्यापार तुम्ही चालवतां अशी तुमच्यावर फिर्याद आहे. तुमच्या घराची झडती घेण्यासाठीं माणसें गोळा केलीं आहेत. "

शोभबाईची बोबडीच वळली. इतक्यांत मुख्य पोलीस अम्मलदार येऊन तिला म्हणाला, " कोणी एका इसमानें संध्याकाळीं तुम्हांला दहा रुपयाची नोट आणून दिली कां ?"

" होय. माझ्या येथें एक अचला म्हणून बाई आहे. तिच्यासाठीं त्यानीं ती दिली होती. "

" मग तेवढी ती नोट रुजूं केलीत म्हणजे झालें. दुसरी झडती घेण्याचं कारण नाहीं. "

' बरं ' असें म्हणून शोभा घरांत आली आणि तिनें ती नोट रूजूं केली. रितसर पंचनामे झाले. शोभा व अचला यांच्यावर पकड वारंटे बजावून त्यांना फरासखान्यांत नेण्यांत आलें. जयपालाला ही बातमी समजतांच तेवढ्या रात्रीं खटपट करून अचला आणि शोभा यांची मॅजिस्ट्रेटकडून जामीनावर सुटका करून त्यानें घेतली.

जयपाल अचला व शोभा यांना घेऊन घरीं आला आणि म्हणाला, " हे सगळं नाटक विलासानं केलं आहे. मला आतांच ही हकीकत समजली. त्याचा आपण बंदोबस्त करूं. "

शोभा संतापानें, अपमानानें आणि मत्सरानें चिडून गेली होती, पण अचलेच्या समोर तिला आपलें मत बोलून दाखविण्याची इच्छा नव्हती. ती म्हणाली, " जयपाल मला तुमच्याशीं कांहीं बाबतींत बोलायचं आहे. ";

" बरं. मग आपण असं करूं ! गांवाबाहेरच फिरावयाला जाऊं. "

" चालेल. "

" शोभा बाहेर पडली, पाठोपाठ जयपालहि बाहेर निघाला. गांवाच्या बाहेर बरेंच लांबवर येईतोंवर कुणीकुणाशीं कांहीच बोललें नाहीं. आतां बरीच रात्र झाली होती, आणि जिकडेतिकडे अंधार गुडुप झालें होतें. नक्षत्रांच्या अंधुक उजेडांत पांचदहा पावलावरचें थोडें बहूत दिसे, त्याच्या अनुरोधानें तीं दोघे चाललीं होतीं. रस्त्यावरून क्वचित एकाद दुसरी मोटार जाई, एवढीच कायती

रहदारी. पण तेवढीहि रहदारी टाळण्यासाठीं शोभा आपणहूनच शेतांतून चालू लागली. रस्त्यापासून आंत बऱ्याच दूर अंतरावर गेल्यावर 'आपण हिथें बसूं' असें म्हणून शोभा खाली बसली. ' बरं ' असें म्हणून जयपालहि तिच्या जवळच बसला, आणि म्हणाला ' शोभाताई, सांगा तुम्हाला काय सांगायचें आहे तें. '

" सांगायचं असतं काय ? आपल्या ह्याचा कांहीतरी उलगडा करून टाकायला नको कां ? "

" होय. चार दोन दिवसांत अचलेला मी एका संस्थानांत पाठवून देणार आहे. तिथें परिचारकांचें शिक्षण देण्यासाठीं कांहीं स्त्रिया घेणे आहेत अशी मी जाहिरात आजच वाचली. हिथें गांवांत राहून तरी विलास तिला, तुम्हा-आम्हाला त्रास देणार, अन् तिचं शिक्षणंहि पुरं होऊं देणार नाही. म्हणून तिला तिथेंच नेऊन ठेऊं. म्हणजे तुम्हाला त्रास नाहीं होणार ! "

" भला कसचा त्रास होतो आहे. ! "

" कां नाहीं ! पुष्कळच त्रास होतो आहे. अन् तुम्हांला वाटत नाहीं, ह्या आजचा प्रकार जो झाला, तो अब्रूच्या दृष्टीनें फार भयंकर स्वरूपाचा आहे ? "

" समजा, हें प्रकरण वर्तमानपत्रांतून कुणी छापलं, तर सगळ्या गांवांत तुमची बेअब्रू छीःथूः व्हावयाची. "

" मी किरातला सांगायला गेलों होतों कीं वर्तमानपत्रांतून ही हकीगत न येईल अशी तजवीज कर म्हणून. पण मला नवल वाटलं. "

" कसलं नवल वाटलं ? "

" कीं फिरून आपला खुशाल म्हणाला, कीं शोभाबाईची बेअब्रू झाली म्हणून मला काय काम त्याचं ! अन् उद्यांच्या सगळ्या वर्तमानपत्रांतून छापण्यासाठीं ही बातमी अगोदरच गेली आहे. तुमच्या फोटोसह ती बातमी येणार आहे, असंहि तो म्हणाला. वर्तमानपत्रवाल्यांना तुमचा फोटो कुठून हो मिळाला ? "

" असं ना ! तर मी सांगतें. हें फक्त किरातांचंच कारस्थान आहे. माझा फोटो किराताशिवाय दुसऱ्या कुणाजवळ नाहीं. "

" पण त्याला तुमच्या विरूद्ध जायचं एकाएकी कारण काय झालं ? तुमचा तर तो चांगला स्नेही होता ? "

" दुसरं काय कारण असणार ? त्यांनीं मला पुनर्विवाहाविषयीं विचारलं होतं, अन् मी नाहीं म्हटलं."

" म्हणून एकदम एवढ्या थराला तो गोष्ट नेईल असं वाटत नाहीं."

"किरातांचा कांहीं नेम नाहीं. तुम्हाला माहिती नाहीं. माझ्याकडे अमूक-अमूक अशी हकीगत तुमच्या विरुद्ध लिहून आली आहे, मी वर्तमानपत्रांतून छापणार आहे, असं सांगून तो दुसऱ्यांच्या कडून पैसे काढतो. विलास त्याला आतांशा भेटतात, अन् ते चांगले आहेत असं तो सांगत होता."

" मग विलासाच्या कटांत किरात सामील झाला तर! मग तुमच्या आमच्या विरुद्ध त्यांनीं खरं म्हटलं म्हणजे जाऊं नये."

" जयपाल, तुम्हाला माहिती नाहीं, तुमच्याबद्दल त्याला हेवा वाटतो!"

" तो का म्हणून ?"

" तुम्ही अन् तो एकदमच सत्याग्रहांत पडलांत, शिक्षा भोगून आलांत तर तुमची जिकडे तिकडे बोलवाला होते अन् त्याला कुणी विचारीत नाहीं, म्हणून, त्याला तुमचा हेवा वाटतो, अन् दुसऱ्या एका गोष्टीबद्दलहि मत्सर वाटतो."

" मत्सर अन् दुसऱ्या एका गोष्टीबद्दल ? कोणत्या बुवा ?"

" अचलेबद्दल ! तुमचं अन् अचलेचं कांहीं तरी आहे असं त्याला वाटतं. अन् तुम्हाला माहित आहे कां ?"

" काय ?"

" अचलेचं अन् किरातांचं लग्नाचं ठरलं होतं लहानपणीं. त्यांचं एक-मेकांवर प्रेम होतं, आणखीन अचलेच्या आईबापांनीं अचलेच्या इच्छेविरुद्ध तिचं विलासाशीं लग्न करून टाकलं. अचलेचं अन् त्याचं अजून भेटणं बोलणं चाललेचं."

" असं ?"

" मला वाटलं तुम्हाला माहित असेल अन् तुमच्या संमतीनं हें सगळं चालत असेल."

माझ्या संमतीची काय जरूरी ? अन् माझी तरी आडकांठी कशाला असेल ?"

" अचलेसारख्या बाईनं असं वागलेलं बरं दिसतं कां ? मला कुणीसं सांगत होतं कीं जिचा नवरा जिवंत आहे अशा बाईशीं संबंध ठेवणाऱ्या पुरुषाला म्हणे कायद्यानं शिक्षा होते. तेव्हां अचलेनं तरी विचार करायला नको होता कां, कीं आपल्यासाठीं दुसऱ्या पुरुषांना शिक्षा भोगावी लागेल असं तरी आपण वागूं नये. एकंदरींत हें असलं करणं कांहीं चांगलं नाहीं, नाहीं ? "

" आपण तरी रूढीला चिकटून राहून सगळ्या गोष्टींचा विचार करतों. म्हणून आपल्याला चांगलं दिसत नाहीं. अचलेसारख्या बाईनं तसं कांहीं केलं तर मी म्हणतो त्यांत काय वावगं आहे ? तिला तरी माणूस म्हणून कांहीं इच्छा वासना आहेतच कीं नाहींत ? आणि तिच्या वासना तृप्त झाल्या तर अशाच मार्गानं तृप्त व्हायच्या. अचलेनं असं वागलं म्हणजे आपण त्याला वाईट म्हणतों, अन् विलासानं धडधडीत दुसरं लग्न केलंन् अन् राजरोस तो दुसऱ्या बायको बरोबर संसार करतों त्याला आपण वाईट म्हणत नाहीं. "

" पण विलासानं दुसरं लग्न केलं आहे ना ! त्याच्या वागण्याला दुराचार म्हणून म्हणता येईल कां ! अचलेसारखीनं कांही जरी केलं तरी तो दुराचारच म्हणतील ? "

" लग्नाच्या बायकोला सोडून किंवा टाकून दुसऱ्या कुठल्याही स्त्रीशीं संसार करणं याला मी दुराचारच म्हणेन. उषेनं विलासाशीं लग्न लावलं नसतं तर विलास–उषाचं एकत्र राहणं आपण दुराचार म्हणून म्हटलं असतं. त्यांचं लग्न होण्याच्या पूर्वी लोक तसं त्यांच्याविषयीं म्हणतच होते. पण त्यांच्या डोक्यावर लग्नाच्या अक्षता पडल्या अन् घटकेपूर्वीचा दुराचार अगदीं शंभर नंबरी सदाचार ठरला. वासनातृप्तीच्या दृष्टीनें विलास-उषा ह्यांचा जसा सोज्वल संबंध आपण समजतों तितकाच सोज्वल संबंध मी अचलेचा अन् दुसऱ्या पुरुषाचा समजेन. "

" टाकून दिलेल्या बायका जर अशा अविवाहित किंवा विधूर पुरुषांना चिकटूं लागल्या तर कुमारिकांची अन् विधवांची लग्न तरी कशी होतील ? समाजाच्या दृष्टीनं सुद्धां ह्याचा विचार नको कां करायला ! पहिल्यानं समाज-व्यवस्था नीट राहिली पाहिजे हें तर खरं ना ! "

" आणि समाजव्यवस्था नीट ठेवण्यासाठींच पुरुषांनीं लग्नाच्या बायकांना टाकून देऊन, खुशाल दोनदोन तीनतीन लग्नं करावींत असं रूढीनं नक्की केलं असावं नाहीं ? समाजव्यवस्था, समाजव्यवस्था असा गिल्ला माजवून दुःखितांच्या आर्त किंकाळ्यांकडे दुसऱ्याचें लक्ष जाऊ नये म्हणून ढोंगी लोक नेहमीच रूढीची ढोलकीं वाजवितात. एकीकडे स्त्रियांना आठपट काम आहे, असं अष्टौप्रहर बोलून स्त्रियांची कामुकतेबद्दल निंदा करायची आणि अशा आठपट काम असलेल्या स्त्रियांना लग्नाच्या नवऱ्यानें टाकून देऊन दुसऱ्या एक दोन तीन वाटेल तेवढ्या बायका पुरुषानें कराव्यात असं म्हणणारा समाज ढोंगीच म्हटला पाहिजे. आठपट काम असतो ना स्त्रियांना ? तर त्यांच्या वासनांची तृप्ती होण्याची तशी योजना असली पाहिजे. भूक फार लागते म्हणून त्या मुलाला जास्त खायला द्यायचं कां भूक जास्त लागते म्हणून मुद्दाम त्याला उपाशीं ठेवायचं ! उपाशी ठेवलेलं मूल चोरून खाईल तर त्यांत दोष मुलाचा थोडाच असणार ? "

" पण विधवांची अन् कुमारिकांची लग्नं कशी होणार ? "

" हात्तिच्या ! परवांच कुणी आंकडेकुडमुड्यानीं कुठंस लिहिलं होतं ना, कीं स्त्रियांची संख्या जास्त असते म्हणून बहुपत्नीतत्वाची चाल पडली. आणखीन ती चाल तशीच चालू ठेवली पाहिजे. विलासासारखे पुरुष दोनदोन तीनतीन लग्न करणारे असतांना हो कसली आली आहे काळजी विधवांच्या अन् कुमारिकांच्या लग्नांची ? एक बायको टाकून देऊन दुसरीशीं लग्न करण्याची जर फॅशन निघाली आहे तर नवऱ्याना काय हो तोटा ? "

" पहिली बायको वाईट असल्याशिवाय कोणी दुसरं लग्न करीत नाहीं बरं का ? "

" दुसरीशीं लग्नाच्या आणाशपथा झाल्या म्हणजेच पहिली वाईट ठरते, तोंवर तिच्याशीं संसार झालेला असतो, मुलंबाळं झालेली असतात, सगळं कांहीं झालेलं असतं. "

" आपल्याला दुसऱ्यांशीं काय करायचं आहे म्हणा ! पण किराताचं अचलेशीं कांहीं तसं वागणं असलं तरी तुमची कांहीं हरकत नाहीं म्हणतां ? "

" तुम्ही काय मला विचारतां आहां ह्याचा अर्थच समजत नाहीं. माझी हरकत असण्याचं कारणच काय ? कां मी तिचा लग्नाचा नवरा आहे, कां कुणी नात्याचा आहे ? नवरा कसाही वागला तरी त्याच्या बायकोनं मात्र नेकीनं राहलं पाहिजे असा आग्रह धरण्यास त्या बाईचा नवरा तरी असूं शकतो किंवा स्वतःच्या प्रतिष्ठेला हपापलेला तिचा बापाभावासारखा जवळचा नातेवाईक तरी असावा लागतो."

" किरात म्हणतो तसं तुमचं तिचं कांहीं असलं तरी तुमची हरकत नाहीं ?"

" अगोदर किरात म्हणतो तेंच मुळी सपशेल चूक आहे. अन् समजा तसा कांहीं संबंध असला तरी मला त्यांत वाईट कां वाटावं ? ज्याला हक्कानं जेवण्याचं ठिकाणंच उरलं नाहीं असा माणूस, आज ह्या अन्नछत्रांत तर उद्यां दुसऱ्या अन्नछत्रांत जेऊन आला तर पहिल्या अन्नछत्रवाल्याला राग धरण्याचं काय कारण ?"

" तुमचं अन् अचलेचं अगदीं खरं खरं कांहीं सुद्धां नाहीं ? शपथेवर खरं सांगा आं !"

" मी बोलतों, तें सगळं खरं असतं. खऱ्याशिवाय मी बोलत नाहीं. माझा तिचा कांहींहि संबंध नाहीं."

" मग तिला किराताच्या हिथें राह्यला जाऊं द्या ! किरात म्हणत होता, कीं अचला माझ्याकडे येत असेल तर मी तिला संभाळीन."

" अचला आपणहून जाईल तर माझी ना नाहीं. पण मी आपणहून तिला तसं सांगणार नाहीं."

" तुला अंतर देणार नाहीं असं तिला वचन दिलं असेल ?"

" होय. ती जीव द्यायला निघाली होती. तेव्हां मी तिला तसं सांगितलं खरं."

" निव्वळ सोंदी आहे. असल्या बायकांचे असेच कावे असतात. तुम्ही दयेनं कांहीं बोलला चालला, ती त्याचा भलता अर्थ घेईल. अन् तुम्हांला फासांत पकडील बरं ?"

" ती पुष्कळ पकडील फासांत, पण मी सांपडलों पाहिजे ना ? हिचं हें प्रकरण गळयांत येऊन पडलं आहे; मधेंच तशी तिला सोडून देतां येत नाहीं. "

" कां नाहीं ? "

" विलासनं अचलेवर सूड घेण्याचं ठरवलं आहे. विलासचंच कशाला ? किरात, विलास, उषा सर्वांनींच तिच्यावर सूड उगविण्याचा चंग बांधलेला दिसतो. सूडाच्या ग्वाईत तिची होळी न होऊं देणं आपलं कर्तव्य आहे. एकाद्या व्यक्तीचं दुःख जर आपल्याला निवारण करतां येत नसेल तर समाजाचीं दुःखं आपण कशी दूर करणार ? आपण दयेला पारखे झालों म्हणजे आपल्या माणुसकीलाच बट्टा लागेल. "

" अचलेची मात्र तुम्हांला दया येते अन् माझी कांहीं दया येत नाहीं. "

" तुमचीसुद्धां दया येते. नाहीं कधीं म्हटलं ? अन् आतां तुम्हाला जी बेअब्रू सहन करावी लागेल, त्यामुळें तर फारच दया येते. म्हणूनच अचलेला दुसऱ्या गांवीं नेऊन ठेवणार आहे. किराताकडेसुद्धां ठेवली असती, पण तुम्ही म्हणतां त्यांचं लग्नापूर्वी प्रेम होतं. तिला आईबापाचा शब्द मोडून किरातासारख्या वारकऱ्याबरोबर लग्न करण्याचं धैर्य झालं नाहीं. त्यासाठीं जेवढा म्हणून सूड घेतां येणं शक्य होतं तेवढा त्यानं उगवून घेतला आहे. तरी त्याचा द्वेष शांत झालेला दिसत नाहीं. अन् आतां तर त्याची अन् विलासाची मैत्री जमली आहे. अचलेचा छळ त्याच्या हिथं खात्रीनं होईल, म्हणून तिला किराताकडे ठेवायची नाहीं. चारदोन दिवसांची गोष्ट आहे आतां. तुमच्याबद्दल खरोखरच मला फार वाईट वाटतं, कींव येते. "

" खरं ना हें ? "

" म्हणजे ? येवढ्याशा क्षुल्लक गोष्टींत सुद्धां का मी खोटं बोलेन ? "

" क्षुल्लक कशानं ? तुम्हाला ती गोष्ट इतर तुमच्या चळवळींच्या पुढं क्षुल्लक वाटत असेल. पण माझ्या दृष्टीनं ही माझ्या आयुष्यांतली मोठ्यांतली मोठी गोष्ट आहे. "

" शोभाबाई, मी तुमच्या बोलण्याचा अर्थ समजलों नाहीं. माझ्या तोंडून चुकून जर कांहीं तसा शब्द निघून असेल तर क्षमा करा. "

" अर्थ समजलात नाहीं असं थोडंच ! जयपाल मी स्पष्टच बोलतें, माझी ह्या प्रकरणानं खूप बेअब्रू होणार असं तुम्हीच म्हणता. किराताचं अन् अचलेचं समजल्यापासून किराताबद्दलचीहि आतां आशा राहिली नाहीं. माझ्याबद्दल तुम्हाला खरोखरी दया वाटते ना ! मग माझी विनंति मान्य कराल कां ? "

" कसली विनंती ? "

" आणि हें सुद्धां मी तोंडानं सांगायला हवं कां ? माझ्याशीं तुम्ही पुनर्विवाह लावाल ना ! तुम्ही विधवाविवाह मंडळाच्या चिटणीसांजवळ म्हणाला होतात, कीं पुनर्विवाह मी करणार आहे. माझी तुमची ओळख पुष्कळ दिवसांची आहे. माझ्या अब्रूचे धिंधवडे कुणी कितीहि काढले तरी तुम्हाला माझी वागणूक माहिती आहे. अन् तुम्हाला अचलेची दया येतें. माझी हकीकत तुम्हांला मी सांगितली नाहीं. मीसुद्धां पुष्कळ पुष्कळ दुःखं भोगलीं आहेत. वडीलांना कर्ज झालं होतं. आणि फेडण्याची ताकद नव्हती. माझ्या लग्नाला पैसा खर्च करायला नव्हता. शेवटीं सावकारालाच मुलगी द्यावी लागली. माझं लग्न वडीलांच्या सावकाराशीं झालं. त्याचं वय पन्नाशीं उलटून गेलेलें होतं, मला सतरावं वर्ष होतं. पुढें चार वर्षांतच माझं हे असे झालं. पन्नास वर्षांच्या नवऱ्यापासून मला संसारसुख किती मिळालं असेल त्याचा विचार करा. पुढें सावत्र मुलांनीं खूप छळलं. हातीं एक पैसाहि लागूं दिला नाहीं, म्हणून पोटासाठीं मला काबाडकष्ट करावे लागले, माझं वय झालेलं, कुणाचा आधार नव्हता. म्हणून कशीतरी शिवणकाम शिकले, आज पोट भरते आहे. जन्माला आल्यापासून सुखाचा नुसता शब्दसुद्धां माझ्या वांट्याला आला नाहीं. मी कसं आयुष्य कंठीत असते ते माझं मला माहित. आतां माझं दुसरीकडे कुठं लग्नाचं जमणं तरी शक्य आहे कां ? अगोदर विधवा बायकांच्याबद्दल लोक नाहीनाहीं त्या कंड्या उठवतात. आणि आतां तर काय वर्तमानपत्रांतून माझी बेअब्रू होणार ! जयपाल नाहीं म्हणूं नका ! तुम्ही नाहीं म्हटलंत तर मला जीव देण्याशिवाय दुसरा मार्ग राह्यला नाहीं. "

"शोभाबाई धीर ठेवा!"

"तुम्ही वचन द्या. मी वाटेल तितक्या दिवस वाट पाहीन. तुमच्या शब्दावर माझा भरंवसा आहे. मग होय ना?" शोभा जयपालच्या जवळ सरकून बसली. तिनें जयपालाचे दोन्ही हात धरले आणि त्या हातांवर डोकें ठेऊन ती म्हणाली, "तुम्हाला मी शरण आल्ये आहे. मला तारणं मारणं आतां तुमच्या हातीं आहे. मला वचन दिल्याशिवाय मी उठायची नाहीं."

"शोभाबाई! हा काय प्रकार आरंभला आहेत तुम्ही? तुमच्याबद्दल कींव येते, दया येते. तुम्हाला मी सदैव मदत करीन. काळजी करूं नका. [जग उलटलं म्हणून माणसांनीं माणूसकीवर कां उलटायचं. उठा, मी तुमचं रक्षण करीन."

"नाहीं. मला लग्नाचं वचन द्या."

"शोभाबाई. माझ्या हातून पार पडतील अशाच गोष्टींबद्दल मी वचनं देत असतों."

"पुनर्विवाहाची बाबत आपल्या हातून पार पडण्यासारखी नाहीं कां?"

"मी आतां काय सांगूं? मी आजवर कधींच ह्या गोष्टीचा विचार केला नाहीं. मी भांबावून गेलों आहे. मला कांहींच उत्तर देतां येत नाहीं. खोट्या आशा मी कुणाला दाखवीत नाहीं. उठा, बाजूला व्हा. माझ्या बुद्धिचा तोल जाऊं लागला आहे, मला सावध झालं पाहिजे. आपल्या हातून ज्या गोष्टी पाळल्या जाणार नाहीं, त्याबद्दलचीं वचनं मी आतां दिली तर त्यांत तुमचा अन् माझा दोघांचाहि अधःपात होईल. मला आतां कांहींच सांगतां येत नाहीं."

शोभा ताडकन् उठून बाजूस सरकली, उभी राहिली आणि म्हणाली, "अचलेला दिलेलीं वचनं आड येताहेत. मला कां दिसत कां नाहीं. तुम्ही वाटेल ते म्हटलंत तरी मला तें माहिती होतंच."

"अजूनहि तुम्हाला असंच वाटतं ना?"

"अजूनपर्यंत तसं वाटत नव्हतं, आतां मात्र नक्की खात्री झाली. बरं चला. एकेकदां माणसांची परीक्षा व्हावी लागते. अन् जयपाल तुम्ही एक करा."

" काय ? "

अचलेची आपली दुसरीकडे जी काय सोय लावायची असेल ती उद्यांच्या उद्यां लावा. तिच्या पायीं माझा सर्वस्वी नाश झाला आहे. यापुढें एक पळभरहि मी तिला घरांत ठेऊं इच्छित नाहीं.

" बरं, " जयपालानें उत्तर केलें.

शोभा परत निघाली. पाठोपाठ जयपालहि चालूं लागला. घरीं येईतोंवर कुणी काहींच बोललें नाहीं. अचला त्यांची वाट पाहत जागत बसली होती.

अचलेला पाहतांच जयपाल म्हणाला, " अचलाबाई, तुम्ही माझ्याबरोबर दुसरीकडे राह्यला चला. तुमचे सामानसुमान सकाळीं येऊन घेऊन जा."

" बरं " म्हणून अचला एका वस्त्रानिशी घराच्या बाहेर पडली.

शोभा वळकटींत तोंड खुपसून हुंदके देऊं लागली. 'येवढे दिवस राह्यली, येवढं मी तिच्यासाठीं सोसलं, पण जातांना एका शब्दांनीं सुद्धां विचारलंन कां बघा ! बरं चला. जयपालाचं संपलं प्रकरण.' असें ती अस्पष्ट शब्दांत स्वतःशीं पुटपुटली आणि पुनः हुंदके देऊन रडूं लागली.



" बाबारे ! तुझ्या त्या बाईला आपली जिच्या तिच्या घरीं पोहोंचवून दे. बरं तर बरं ! ही आपली पहाटे विहीरवर जीव द्यायला जायला अन् मी तिथें जायला एक वेळ आली, मी कशीबशी तिची समजूत घालून परत फिरवली. नसतं अपेश अंगावर येईल. जिच्यातिच्या घरीं पोंचवून दे. पाहिजे तर आपले दोन पैसे उचलून द्यावेत. " जयपालाची आई तो चहा पीत असतांना म्हणाली.

" तिला जायला घरच नाहीं कुठें ! नवऱ्यानं तिला टाकून दिलेली आहे. " जयपाल म्हणाला.

" अशा बाईची कशाला बाळा गळ्यांत धोंगडं घेतोस ? तिची ती पाहिजे ते का करीना ! हिच्याच नवऱ्यानं फिर्याद केली होती ना तुझ्यावर ! दहा माणसांत ही राहली तरी आमची ना नाहीं. " आई म्हणाली.

" आई तुझी ना नसली तरी आमची हरकत आहे. आजच्याच वर्तमानपत्रांतून आलेली हकीगत आई तूंच वाचून बघ. हिच्यावर विश्रामशाळेतली एक मास्तरीण धंदा चालवीत असे. म्हणून दोघींना काल रात्रीं अटकेत घेतलं होतं. असल्या बायका मुलामाणसांच्या घरांत कां राहूं द्यावयाच्या ! " जयपालचा धाकटा भाऊ म्हणाला.

" असं ना ! बाबा. तूं आपले पैसे उचलून दे तिला. तिची राहण्याची दुसरीकडे सोय बघ. " आई म्हणाली.

" बरं ! तुला सांगायला काय होतं पैसे उचलून दे म्हणून ? माझं शिक्षण पुरं व्हायचं आहे अजून, इतर भावांची लग्नकार्यं व्हायचीं आहेत. बाबासाहेब पैसे मिळवीत असते तर गोष्ट निराळी होती. सत्याग्रहांत दाखल झाल्यापासून धंदा बंद केला, आतां त्यांनीं मिळवून ठेवलेल्यांतूनच सर्वांचे खर्च चालायचे आहेत ना ! " जयपालचा भाऊ म्हणाला.

" बरं मी दुसरीकडे कांहीं तरी व्यवस्था करतों." इतकेंच बोलून जयपाल उठला आणि निघून गेला.

" ह्यांची बायको मेलीं, मुलंबाळं कुणी जगली नाहींत, म्हणून हे घराचा कुंटणखाना बनवीत आहेत. स्वतःची बायको असती तर त्यांनीं ह्या बाईला घरांत आणलं असतं कां ! पण तुम्ही आम्ही ह्यांच्याच अन्नावर पोसले जातो ना ! तोंवर आम्हाला तुम्हाला काय बोलण्याचा अधिकार असं म्हणतील. आमच्या संसाराची पहिल्यानं यथास्थित व्यवस्था लावा अन् मग वाटेल तें करा म्हणावं." भाऊ बडबडत होता.

" ह्यांची बायको मेली, ह्यांनीं डोक्यांत राख घातली. अन् आम्ही ह्याच्या करतां स्वार्थत्याग करतों, खस्ता खातों, त्याची ह्याला किंमतच नाहीं. मेल्यानो मला येवढा दमा खोकला झालेला, रात्रभर डोळ्याला डोळा नाहीं. ह्यांनीं पैसा मिळवला, आम्ही जेवतों, म्हणून आम्ही कांहीं कुणाचे ओशाळे नाही आहोंत. माझ्याच वडीलांनीं ह्याला शिकवलं म्हणून तर ह्यानी पैसा मिळवला ना ! मला ह्यांनीं जन्मभर खायला घातलंच पाहिजे. मी अशी बसून खाणार. घरांत काम करायला बायको जिवंत नाहीं तर म्हणावं कुणाला सांगतोस. नोकर ठेव. आई तूं स्वस्थ बसून राहा. चट नोकर ठेवील. " जयपालची घरी आलेली बहीण कडाडली.

आणि हीं बोलणीं एकीकडे घरांत कोंपऱ्यांत भयभीत होऊन उभी राहिलेली अचला आणि दुसरीकडे उद्वेगाच्या भरांत वणवण करीत बाहेर पडणारा जयपाल हीं दोघें निमूटपणें ऐकून घेत होतीं. ती वेळ अशी होती कीं बोलणाऱ्यांनीं वाटेल तितके कठोर शब्द बोललें तरी प्रतिकार होणार नव्हता आणि तीं बोलणीं निमूटपणें सहन केल्याशिवाय त्या दोघांनाहि गत्यंतर नव्हतं.

जयपाल घरीं जेवायला आलाच नाहीं.

अचलेने डोळ्यांतल्या पाण्याबरोबर कसेबसे दोन घास पोटांत कोंबले.

दुपारी मॅजिस्ट्रेट पुढें काम निघालें, साक्षी वगैरे पुरावे झाले. शोभाबाई शाळेंत मास्तरीणीचें काम करते आणि अचला ही एक पतित्यक्ता तिच्या आश्रयाला राहून शिकणारी स्त्री आहे, आणि ह्या दोन्ही स्त्रिया कुलिनाच्या आहेत, विलासानें खोटी बातमी देऊन केवळ सूड उगविण्यासाठीं हें नाटक रचलें, असा निकाल होऊन अचला आणि शोभा ह्यांना सोडून देण्यांत आलें.

कचेरीतून बाहेर पडल्यावर जयपाल शोभाला म्हणाला, " शोभाबाई, तुम्हाला फार त्रास झाला माझ्यासाठीं. मी क्षमा मागतों. काल तुम्हाला पकडल्याचं कळल्यापासून माझ्या जीवांत जीव नव्हता. मी आपली सगळी पुण्याई खर्चून तुम्हा दोघींची आजच्या आज सुटका करून घेतली. खरंच, मी तुमचा शतशः अपराधी आहे. मला क्षमा करा. "

" नंतर भेटाल ना ? " शोभानें विचारलें.

" नाहीं. मी अचलाबाईना घेऊन असाच परस्पर स्टेशनावर जाणार आहे आणि पुढं एका गांवीं जाईन." जयपाल म्हणाला.

" अन् परत केव्हां याल ? " शोभानें विचारलें.

" काय सांगणार ? तिथं मी एक दोन दिवस राहीन. पुढं दुसऱ्या कुठल्यातरी प्रांतांत हिंडेन. "

" कां ! परत नाहीं येणार हिथं. ? " शोभानें विचारलें.

" काय सांगावं ? आमच्या घरांतल्या मंडळींना माझ्या येण्याची फारशी जरूरी उरली नाहीं आतां. तेव्हां तुमच्या सारख्या स्नेह्यांच्याकरितां आलों तर यायचं. " जयपालाचा आवाज घोगरा झाला. डोळे लाल झाले.

" स्नेहांना तुम्हीं कध्धीसुद्धां नकोसे व्हायचे नाहीं, बरं का ! जरूर परत या. निदान माझ्यासाठीं तरी परत या. याल ना ? " शोभा द्रवली, आर्त स्वरांत म्हणाली.

" बघेन. तुम्ही उभ्या रहा. मी टांगा पाहून येतों. " असें म्हणून जयपाल दूर गेला.

अचला भीतभीत शोभाजवळ गेली आणि शरमून म्हणाली, " शोभाबाई, माझा तुम्हांला खूप राग आला असेल नाहीं ? आणखीन मी अपराधी

आहे. पण काय करूं ? माझं नशीबच कसं माझ्या हात धुऊन पाठीमागं लागलं आहे, बघानात ?" अचलेनें डोळे पुसले.

शोभानें तिच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं.

"तुम्हांला वाटेल येवढे दिवस आपल्या हिथं राह्यली ही, आणखीन जातांना नुसतं विचारून सुद्धां गेली नाहीं. पण काल घरांतून निघतांना माझं डोकं ठिकाणावर नव्हतं. माफ करा आं. कांहीं कमी जास्त बोललें असेन, चुकी झाली असेल तर. घरांतून ज्या विचारांनीं म्हणून निघाले तोहि साध्य झाला नाहीं. जयपालांच्या आईनं आडवलं ! कुठवर हाल काढायचे आहेत कुणाला ठाऊक ?"

शोभाच्या कपाळाला जास्तच आंठ्या पडल्या. ती टांग्याच्या बाजूला चालूं लागली. जातांना पुटपुटली. 'सांगायलाहि कांहीं वाटलं नाहीं, कीं ह्यांची आई हिच्या बेताच्या आड आली. आतां परप्रांतात जाती आहे बरोबर तर उजव म्हणावं तुझे योजलेले नेमधर्म तिथं.'

जयपाळानें आणलेल्या टांग्यात शोभा बसली. शोभेनें जयपालाकडे पाहण्याचे टाळलें. टांगा निघून गेला,

जयपाल अचलेला घेऊन एका संस्थानाच्या राजधानीस आला.

तेथील हॉस्पिटलमध्यें अचलेला परिचारिकेचा शिक्षणक्रम घेण्यासाठीं ठेवण्याच्या व्यवस्थेंत दोन दिवस गेले. तिची व्यवस्था लागली आणि काळजींतून मुक्त झाल्याच्या स्वरांत जयपाल अचलेला म्हणाला,

"हें संस्थान बरं आहे राह्यला नाहीं ! हिथला शिक्षणक्रम पुरा केल्यावर तुम्ही ह्याच राज्यांत नोकरी करा. हवा उष्ण आणखीन उन्हाळा फार पडतो म्हणा. पण संवयीनं हीच हवा बरी वाटेल. तुमची व्यवस्था लागली. मी एका मोठ्या काळजींतून मुक्त झालों."

"माझ्यावर फार मोठे उपकार झाले, मला कुठेतरी पोटाला लावलीत. हिथे उन्हाळा फारच आहे. पण आपण मुळी आश्रयासाठीं येथें आलों तर आश्रय मिळाल्यावर कडक हवेचं कांहीं सुद्धां वाटायचं नाहीं. आतां तुम्ही हिथून पुढे कुठं जाणार ?"

"मी प्रथम अमदाबादेस जाईन. साधकाश्रमांत कांहीं दिवस राहीन.

ग्रामोद्धार, अस्पृश्यतानिवारण, खादीप्रचार ह्या पैकीं कुठल्यातरी रचनात्मक कार्यक्रमांत पडेन. आणि आतां विचार असा आहे कीं ह्याच प्रांतात काम करावें. घरीं राहण्याची खास जरूरी नाहीं. भाऊ मोठे झाले आहेत. ”

दुसऱ्या दिवशीं अचला परिचारिकांच्या वसतिगृहांत राह्यला जाणार होती, जयपाळ पुढें निघणार होता. त्यांची आवराआवर चालली होती, तोंच दोन संस्थानी पोलीस आणि एक ब्रिटिश पोलीस दोन वारंटें घेऊन त्यांचा शोध करीत आले.

ब्रिटिश मुलखांतून परप्रांतांत अनीतीचें काम करण्यास भाग पाडण्याच्या उद्देशानें जयपाल ह्यानें आपली बायको अचला हिचें मनुष्यहरण केलें आहे आणि अचलेनें घरांतील दागदागिन्याची चोरी करून ती पळून आली आहे, अशा प्रकारची फिर्याद विलासानें दाखल केली होती आणि त्या आरोपासाठीं म्हणून ह्या दोघांची संस्थानी पोलीसांनी धरपकड केली. परहद्दींत गुन्हा करून दुसऱ्या संस्थानाच्या हद्दींत पळून जाणाऱ्या आरोपींना अटक करून, फिर्यादीचे पुराव्याचे कागद तयार होऊन आले कीं ते पाहून त्यांना परत सोपवावयाचे कीं नाहीं ते ठरवावयाचे असते. ह्या कायद्याखाली त्यांची धरपकड करण्यांत आली आणि त्यांना कच्चा कैदेंत पाठविण्यांत आलें. परप्रांतांत जयपाल तरी काय करणार ? तथापि त्याच्या ओळखीचे एक वकील येथेंच वकिली करीत असल्याचें त्याला आठवलें आणि त्यांना निरोप पोहोंचविण्याची त्यानें तजवीत केली. सदर वकिलानें ताबडतोब जयपालाची आणि अचलेची भेट घेतली व जामिनावर सुटका करण्याबद्दलचे अर्ज तयार केले. “ हे परहद्दींतले आरोपी सोंपविण्याचं काम हिथल्या मुख्य न्यायाधीशांच्या पुढें चालेल. जामीनावर तुमची सुटका आज उद्यां करतो. निश्चिंत असा. ” असें आश्वासन देऊन जयपालचा वकील परत आला. ’

आणि त्याच वेळीं विलास हा मुख्य न्यायाधीशांच्या बंगल्यावर शिवरोलेट गाडीचा एजंट म्हणून भेटायला गेला होता. मुख्य न्यायाधीशांची ख्याती अशी होती, कीं ते कुणांचेहि ऐकत नसत, लांच खात नसत, केवळ कायदा आणि सत्य ह्यांच्या पोलादी तराजूनें तोलून निकाल देत असत. ते इतके

तुसडे असत, कीं वकील मंडळी मुद्धां त्यांच्याकडे भेटण्यास जाण्यास खुषी नसत.

" आपणाला मोटार घ्यायची आहे असं ऐकलं म्हणून नवीन मॉडेल पहावं अशी विनंती करण्यासाठीं आलों आहे." विलास म्हणाला.

" माझी जुनी कार शिहरोलटेचीच आहे. ती घेऊन नवीन देत असाल तर पाहा." न्यायाधीश म्हणाले.

" होय. सहज करूं. आपली कार आज पाहतो. नवीन मॉडेल काल मुंबईस चढवलं आहे. परवांच्या दिवशीं उतरेल. नाहींतरी मला हिथे बरेच दिवस राहवं लागणार आहे. मी आलो होतों खासगी कामालाच. पण मला कुणीसं सांगितलं कीं आपल्याला मोटार बदलायची आहे. मी मुळचा कांहीं हिथला राहणारा नाहीं. पण संसारिक आपत्तीमुळं ह्या अशा कडक उन्हाळ्यांत येऊन पडलों आहे."

" असं ?"

" स्वतःच्या तोंडानं बेअब्रू सांगण्याची मला लाज वाटते. पण कुणाला तरी सांगतली पाहिजे म्हणून हकीगत सांगतो. माझ्या बायकोचा आणि शेजाऱ्याचा वाईट संबंध जडला. बायको घरांतले सर्व दागदागिन्यांची चोरी करून त्या इसमाबरोबर पळून गेली. शेवटीं तपास करतां हिथे आहेत असं समजलं. मी हिथे अगदींच परका आहे. त्या गृहस्थांच्या हिथे ओळखीपाळखी आहेत. कांहीं वकील त्यांचे मित्र आहेत. अशा संकटांत मी सांपडलों आहे."

" हें पहा, कचेरींतल्या कामाचं हिथे कांहीं बोलूं नका," असें म्हणून न्यायाधीश जागेवरून उठले आणि म्हणाले. " तुमचं हे कोर्टातलं काम संपलं म्हणजे आपण बोलूं."

त्याच्या दुसऱ्या दिवशीं जयपालचे वकील जामीन अर्ज घेऊन गेले. तो अर्ज वाचतांच न्यायाधीशानीं तो झुगारून देऊन म्हटलें.

" तुम्ही अशांची कामे घेतां कामा नयेत. ही मंडळी बदमाष आहेत."

" पुढें फिर्यादींत ठरेल, कीं बाईचा नवरा विलास हा बदमाष आहे कां हे आरोपी बदमाष आहेत. मला त्यांनीं रोकलें, माझे कर्तव्य आहे काम चालविण्याचें."

" हा इसम तुमचा स्नेही आहे कीं नाहीं ? "

" मला नाहीं वाटत जामीनाच्या अर्जाच्या कामांत कोर्टाला असला प्रश्न वकीलाला विचारतां येतो ? "

" बरं, बरं ! संभाळून बोला. असल्या गुन्ह्याच्या कामांत जामिन घेतां येत नाहीं. "

" कायद्यांत हे दोन्ही गुन्हे आरोपींना जामिनावर सोडतां येण्यासारखे गुन्हे आहेत. तिकडून आलेल्या पकडवारंटांतहि योग्य जामिनावर सुटका करण्याबद्दल लिहिलें आहे.

" आरोपी परहद्दींतले आहेत. "

" पण त्यांनाहि कायदा तोच लागू आहे. आणि जामिनावर सोडलं पाहिजे अशी माझी विनंती आहे. "

" बरं सोडतों. पन्नास हजारांचा प्रत्येकी जामीन दिला तर सोडतों. "

" ही रक्कम फार आहे साहेब ! परप्रांतांत त्यांना येवढा मोठा जामीन कुठून मिळणार ? आरोपी प्रतिष्ठित गृहस्थ आहे. "

" पंचवीस हजाराचे जामीन द्या. "

" कुठून आणणार ! "

" तुम्ही स्वतः जामीन रहा, तुमचे ते स्नेही आहेत. "

" मला वाटतं आपली कांहीं तरी गैरसमजूत झाली आहे. दुसऱ्या कुठल्या तरी कामाची हकीगत आपल्या ध्यानांत असावी. ह्या कामांतली हकीगत मला सुद्धां कालच समजली अन् आपल्यापुढें तर ती ह्याच घटकेस प्रथम रुजूं होत आहे. आरोपी माझे स्नेही आहेत हें आपणास कळलें तरी कसें ! आणि सांगितलें तरी कुणी ? हें मला कळलें तर मी त्याचा खुलासा करूं शकेन. "

" तुम्हींच सांगा कीं तुम्ही त्यांचे स्नेही आहांत कीं नाहीं ? "

" कोर्टाबाहेरच्या हकीगती सांगण्याला मी बांधलेला नाहीं. आणि खुद्द कोर्टानेंहि ऐकलेल्या कंड्या लक्षांत घेणें हें गैरवाजवी होईल. "

न्यायाधिशांचा चेहरा संतापानें लाल झाला. त्यांनीं पंचवीस हजाराचे जामीन घेण्याचा हुकूम केला. निःपक्षपाती न्यायाचा कौल जयपालला मिळाला.

जयपालाचें दुर्दैव कीं ह्या न्यायाधिशाच्या एका स्नेह्याच्या मुलीला एका तरुणानें थोड्याच दिवसापूर्वी पळवून नेली होती. आणि म्हणून त्यांच्या डोक्यांत असल्या गुन्ह्याबद्दल विशेषच संताप धुमाकूळ घालीत होता. विलासाच्या भेटण्याचाहि अनिष्ट परिणाम झाला नसेल असें थोडेंच! गुजरातसारख्या प्रांतांत आणि तेहि कडक उन्हाळ्याच्या दिवसांत जयपाल आणि अचला निरनिराळ्या खोल्यांतून कच्च्या कैदेंत खितपत पडले असतांना त्यांचा तो काल किती कष्टांत गेला असेल त्याची कल्पनाच करावी.

एक महिन्यानंतर किरात जयपालाला भेटायला आला. आणि म्हणाला "जयपाल! तुम्ही अचलेला मुळींच मदत करायची नाहीं असें कबूल करीत असाल, तर विलास तुमच्या विरुद्धची फिर्याद काढून घेणार आहेत."

"बरं! मी ऐकलं तुमचं म्हणणं! तुरुंगांतून सुटल्यावर विचार करीन. शोभाबाई खुशाल आहेत ना! परत गेल्यावर त्यांना सांगा, मी विचारलं होतं म्हणून. बरं जा आतां तुम्हीं."

नंतर किरात अचलेला भेटायला गेला आणि म्हणाला "तूं जर जयपालचा संबंध सोडशील...."

"काय म्हणालास! किरात जिभेला हाड असूं दे." अचलेनें म्हटलें.

"जयपालशी जर संबंध सोडणार असशील तर विलास तुझ्यावरची फिर्याद काढून घेणार आहेत. तुला शिकायचं असलं तर माझ्या हिथे राहिलीस तरी विलासांची हरकत नाहीं. जयपालहि तुला कंटाळले आहेत. तूं त्यांना जबाबदारीतून मुक्त करणार असशील तर ते तुला सोडण्यास तयार आहेत. मग काय विचार आहे?"

"मी कांहींच उत्तर देऊं इच्छित नाहीं."

किराताचा डाव फसला, तो हिरमुसला होऊन परत फिरला. वास्तविक किराताला शोभेनेंच जयपालला सोडविण्यासाठीं पाठविलें होतें. पण किरात शोभेच्या पैशानें येऊन आपलाच डाव खेळूं लागला होता.

कच्चा कैदेंत दोन महिने तब्बल काढले तरी सुद्धां विलासाचे फिर्यादीचे कागद रुजूं होऊं शकले नाहींत.

आणि नाइलाजानें मुख्य न्यायाधीशांना जयपाल आणि अचला ह्यांची कच्च्या कैदेंतून सुटका करावी लागली. हुकूम करतांना जयपालच्या वकिलांना त्यांनीं बोलावून घेतलें होते आणि नंतर ते म्हणाले.

" विलास हा लबाड दिसतो माणूस."

" कां ? मोटारीची आदलाबदल त्यानं करून नाहीं दिली कां अजून ?"

" नाही ! नाही ! तुम्हाला कुणी सांगितलं ? मी पैसे जास्त देऊन नवीन मॉडेल विकत घेणार होतो. तुम्हांला कुणी सांगितलं ?" न्यायाधीशांची बोबडी वळली.

" जयपाल हे माझे स्नेही आहेत हे आपल्याला ज्या गृहस्थानं सांगितलं तोच गृहस्थ नंतर माझ्याकडे येऊन मला मेटारची हकीगत सांगत होता. आमच्या पक्षकाराचं दुर्दैव म्हणून त्याला विनाकारण आपल्यासारख्या न्यायी अम्मलदाराच्या हुकमानं उन्हाळयांत दोन महिने कच्च्या कैदेंत काढावे लागले."

बोलाचे देणें बोलांनीं फेडलें, पण हालांचें उणें परत आलें नाहीं.

सुटून बाहेर येतांच जयपाल अचलेला म्हणाला. " अचलाबाई ! दोन महिने मी ह्याच गोष्टीचा विचार करीत होतों. मला मार्ग सुचत नाहीं. चला आपण असे तडक महात्माजींच्याकडे जाऊ. सामाजिक अन्याय त्यांच्या समोर मांडू. कांहीं जर मार्ग दाखविला तर तेच दाखवितील."

" जयपाल तुम्हीं माझ्यासाठीं अनंत विटंबना सहन केल्यात. मी आपली एकटी कुठेंहि भीक मागून खाईन. तुम्हाला मी आणखीन संकटांत टाकू इच्छित नाहीं."

" तुमचें दैन्य फिटलें, कीं माझें कार्य संपलें. मी लगेच बाजूस सरेन. पण मधेंच तुम्हाला खाईत सोडून देणं भ्याडपणाचं आहे. आपण महात्माजींना भेटून मग काय तें ठरवू."

---

# ९

"समजली मला सगळी हकीगत." महात्मा गांधी हातांतलें वर्तमान पत्र खालीं ठेवीत म्हणाले.

जयपाल आणि अचला महात्मा गांधींच्या शेजारी आदबीनें हात जोडून बसलीं होतीं. भोंवतालीं एकाहून एक बडे राजकारणी धुरंधर पुढारी बसले होते. महात्माजींशीं मोठमोठ्या गहन प्रश्नांवर विचारविनिमय करण्यासाठीं ते सर्व आतूर होते, आणि जयपालानें उठून जावें असेंहि त्यांतल्या एकानें खुणेनें सुचविलें. जयपाल अर्धवट उठणार इतक्यांत गांधींनीं त्यास खालीं बसण्यास खुणावलें आणि म्हटलें.

"ह्यांचं काम संपवूं या. लग्नाच्या बायकोवर नवरा अमानुष जुलूम गुजारतो आहे, तिला टाकून देऊन त्यानें दुसरें लग्न केलें आहे तरीसुद्धां नवरा हिला छळतो आहे. तर हे विचारतात काय करावं." महात्माजीनीं अचलेकडे हांसून पाहिलें आणि विचारलें, "बाई तुम्हाला संसार करण्याची इच्छा आहे ना?"

अचला भांबावून गेली होती, ती ह्या प्रश्नानें तर जास्तच गोंधळली आणि खाली जमिनीकडे पहात राहिली.

"अन् जयपाल ह्या सामाजिक अन्यायाविरुद्ध सत्याग्रह करण्याची तुमची इच्छा आहे का! कुठलाही प्रकारचा अन्याय घ्या. सत्याग्रहानेंच दूर झाला तर तो होईल.

" आम्ही स्त्रिया या अन्यायाबद्दल सत्याग्रह करीतच आलों आहोंत. आज शेंकडों वर्षे आम्ही हा अन्याय निमूटपणं सहन केला. अन्यायाच्या घायावर नुसते बळी दिल्यानं कांहीं परिणाम होत नाहीं." अचला म्हणाली.

" म्हणणं बरोबर आहे " महात्माजी म्हणाले. " कायद्याला आधीन होऊन निमूटपणं जुलूम सोसणं हा खरा सत्याग्रह नव्हे. तुम्ही भगिनींनीं नुसता जुलूम सोसलात. तोहि एक सत्याग्रहाचाच भाग आहे. पण त्याचा उपयोग होत नाहीं तेव्हां आतां दुसरी पायरी अंमलात आणली पाहिजे. आजचे अन्यायी कायदे बदलले पाहिजेत. अन्यायी कायद्यांतून न्याय शोधून काढणें शक्य आहे का ? पाश्चात्य देशांत अशा बायका काय करतात माहित आहे ? घटस्फोट घेऊन दुसऱ्या पुरुषाशीं लग्न करतात. आणि तेंच बरोबर आहे. आपले कायदे अन्यायी असेल तर ते मोडून बदलले पाहिजेत. चार वर्षांपूर्वी तुमच्या सारख्याच एका दक्षिणी भगिनीला मी सांगितलं तेंच तुम्हांला सांगतो. नवऱ्याला स्पष्ट कळवा कीं तू मारझोड करतोस, पोटगी देत नाहींस, दुसरं लग्न केलं आहेस, आपलं नवराबायकोचं नातं संपलं. तूं जसं दुसरं लग्न करून संसार करीत आहेस तसं मीहि दुसरं लग्न करून संसार करणार आहे. कायदा मोडल्याबद्दल बाईला आणि तिच्याशीं लग्न करणाराला शिक्षा भोगाव्या लागतील, तरी भोगल्या पाहिजेत. त्या बाईनं असंच केलं तिचा नवरा गप्प बसला, आज त्या बाईचा संसार चांगला चालला आहे. तुम्ही दोघांजणानीं ठरवा. बरं मी आतां दुसऱ्या माणसांशीं बोलतो ! " महात्माजीनीं हात जोडून हांसत म्हटलें.

जयपाल आणि अचला लवून नमस्कार करून उठलीं व तेथून बाहेर पडलीं. ती मुक्कामावर आलीं.

दिवसभर जयपाल गुजराथविद्यापीठांत होता, सायंकाळीं परत आला, आणि अचलेला घेऊन तो साबरमती नदीवर फिरायला गेला. लोकांच्या रहदारीपासून लांबवर गेल्यावर वाळवंटात तीं दोघें बसलीं.

" अचलाबाई, आज महात्माजींचं ऐकलंत सांगणं ! मी म्हटलं नाहीं कीं तुम्हांआम्हांला मार्ग सुचेनासा झाला तरी महात्माजींच्या जवळ मार्ग असतो. कुठलाहि प्रश्न त्यांच्यासमोर ठेवा, त्याला ते भक्कम सत्याची कसोटी

लावतील आणि समाजरूढीशीं विरुद्ध असा निष्कर्ष निघाला तरी सत्य म्हणून त्याला शिरसावंद्य मानतील, आणि कुठलाहि अभ्यास घ्या. त्याला ते सत्याग्रहाच्या कोष्टकांत आणून टाकतील आणि अचूक मार्ग शोधून काढतील. त्यांचं मोठेपण ह्यांच्यांतच आहे. कीं सत्य तेवढंच मान्य करायचं. त्या सत्याच्या जोरावर सामाजिक अन्याय त्यांना अचुक दिसतात. महात्मा केवळ राजकारणी पुरुष नाहीत. जगांत क्रांति घडवून आणणारे शककर्ते आहेत. आपण दक्षिणी माणसं त्यांना ओळखीत नाहीं. त्यांच्या कर्तृत्वाच्या तेजानं दिपून गेल्यानं त्यांच्या महत्तेकडे आपल्याला टक लाऊन पाहतां येत नाहीं. दिवाभितांप्रमाणं आपापल्या घरकुलात लपून बसून त्यांच्यावर अनन्वित आरोप आपण लादतो, त्यांची अनेकप्रकारें अनाठायी निर्भत्सना आपण करीत असतो. आजवर पुष्कळ नेते होऊन गेले. अगदीं आपले टिळक, गोखले, रानडे घेतले तरी सर्वांगीण आणि व्यापक क्रांती घडवून आणण्याची त्यांतल्या एकाचीहि धमक नव्हती. सामाजिक क्रांती घडवून आणल्याखेरीज आपला उद्धार होणं शक्य नाहीं ही बाबत त्यांना उमगली नव्हती आणि क्रांतीचीं सूत्रेंहि त्यांना सुचली नव्हतीं."

"मी गांधींना आत्तांपर्यंत पाह्यलंच नव्हतं. त्यांच्यासमोर · बसलें होतें. त्यांनीं प्रश्न विचारला. मी भांबाऊन गेलें होतें. उत्तरच मला सुचेना."

"महात्माजी ही सत्याची मूर्ती आहे, त्यांच्यापुढें असत्य टिकतच नाहीं. तुम्ही वाटेल तेवढं ठरवून जा, की आपण त्यांच्यापासून आपले विचार लपवून ठेऊ, पण त्यांच्या सात्विक बोलण्यामुळें आपल्याला खोटं बोलण्याची लाज वाटते."

"मला त्यांनी विचारलं, तेव्हां माझं तरी तसंच झालं. वाटलं, कीं सांगावं की संसाराला मी विटले आहे. पण विचार केला येवढ्या महात्म्यापुढें आपण जाणून बुजून खोटं कशाला बोला."

"आणि खोटं बोलला नाहीत ते चांगलं केलंत. महात्माजी तुमच्या खोट्या उत्तरानं मुळीच फसले नसते. आतां आपलं काम संपलं आपण आज किंवा उद्यां परत जाऊं."

"आपण इकडच्याच प्रांतांत राहालं तर! दोन पावलं दूर असलं म्हणजे

तेवढा संताप कमी ! मला कुठेतरी नोकरी लाऊन द्या. कुठेहि कुणाच्या घरीं सैंपाक करण्याची नोकरीसुद्धां मी करीन. "

" पुढं काय करायचं तें आत्तांच ठरवूं आपण. महात्माजींनीं सांगितलेलं ऐकलंतच तुम्हीं ! पुरुषाला अनेक लग्नं करतां येतात, बाईला एका नवऱ्याच्याच हयातींत दुसऱ्यांदा लग्न करतां येत नाहीं, असला अन्यायी कायदा आहे. त्या कायद्याचा भंग केला पाहिजे. आजवर लक्षावधी बायकांनीं कायद्याच्या जुलमापुढे निमूटपणें आपली मान दिली. समाज तटस्थपणानं त्यांचे बळी पडत असतांना पाहत राहिला. आतां हा अन्याय न्यायकचेरींच्या चव्हाट्यावर मांडला पाहिजे. त्यासाठीं शिक्षा भोगावी लागली तरीं त्याला तयार असलं पाहिजे. "

" मलाच शिक्षा होणार असली तर मी कांहीं भीत नाहीं. पण —"

" आणि मला शिक्षेची मुळींच भीति वाटत नाहीं ! मी ह्यापूर्वी दोन वेळां सक्तमजुरी शिक्षा भोगून आलों आहे. अन् दोन्ही वेळी विसापूर तुरुंगांत राहून आलों आहे. "

" पण राष्ट्रासाठीं शिक्षा भोगणं निराळं, आणखीन एकाद्या बाईसाठीं शिक्षा भोगणं निराळं ! "

" निराळं काय त्यांत ? अन्यायी कायद्यांचा भंग करावयाचा हाच दोन्हींत हेतू. कुठलाहि असला तरी अन्याय तो अन्यायच, आणि तो दूर करण्यासाठीं सत्याग्रहच केला पाहिजे. राजकीय बाबतींतला अन्याय तेवढाच काय तो अन्याय आणि सामाजिक बाबतींतला अन्याय तो न्यायच, अशी पक्षपाती दृष्टि ठेवणारे आपमतलबी पुढारी केवळ स्वतःच्या लोकप्रियतेला धक्का लागू नये म्हणून सामाजिक विषमतेची तरफदारीहि करतात. गांधींचा संप्रदाय हा म्हणूनच निराळा पडतो. राजकारणांत गांधींचं वाक्य शिरसावंद्य मानणारे घेतलेत तरी त्यांतले बहुतेक लोक सामाजिक क्रांतीच्या बाबतींत गांधीजींचें विचार कबूलहि करीत नाहींत. सर्वांगीण क्रांति घडवून आणण्याचा गांधीजींचा कार्यक्रम आपण अंमलात आणायचा नाहीं आणि त्यांच्या मार्गानें जाऊन स्वराज्य मिळणें शक्य नाहीं असं उलट आपणच गांधीजीवर दोष

लादावयाचा. कुठलाहि 'अन्याय दिसला तरी तो दूर करण्यासाठीं सत्याग्रही माणसानं मरण्यास तयार झालं पाहिजे."

"पण माझ्या सुखासाठी तुम्हाला संकटांत टाकावं ह्याला मात्र मी कबूल नाहीं. आजपर्यंत काय कमी त्रास सोसलात! तुम्ही माझी बाजू घेतलीत, माझं रक्षण झालं खरं, पण उपकारकर्त्यांवर असल्या आपत्ती आपल्यामुळं ओढवाव्यात हें मला पहावतं नाहीं? एका दृष्टीनं तुमच्या उपकाराचा अपकारानं सूडच उगवला जात आहे नाहीं का!"

"सूड तर उगवला जात आहे. पण तुम्ही उगवीत नाहीं. विलास सूड उगवीत आहे."

"आणि इतर मंडळी काय कमी करीत आहेत? किरात, शोभा, उषा ही तरी आपपल्या परीनं सूडच उगवताहेत आपल्या दोघांवर."

"त्यांना प्रत्येकाला वाटतं, कीं त्यांच्या आड आपण येतो, अचलाबाई, मला खरी हकीगत सांगा."

"तुमच्यापासून मला कांहीं चोरून ठेवायचं असेल तर मी खोटें बोलणार ना! आजपर्यंत मी सत्य हकीगतच सांगितली आहे."

"तुम्हाला संसार करण्याची इच्छा आहे का?"

"ह्याचं उत्तर मी काय देणार? गांधीजीनीं हाच प्रश्न विचारला, उत्तर मनांत घोळत होतं. पण भोवताली मोठमोठीं माणसं ऐकत होतीं. म्हटलं आपण गप्प बसावं."

"मग आतां सांगा, काय जे तुम्ही बापूजींना सांगणार होतांत तें?"

"दुसरं काय सांगणार होते म्हणा! म्हणणार होते कीं संसारसुख मुळींच जिला अजूनपर्यंत मिळालेलें नाहीं अशा माझ्या वयाच्या बाईला काय वाटत असेल, तें तुम्हीच ठरावा."

"बरं दुसरं एक विचारतो. विचारूं?"

"हो."

"किराताचं अन् तुमचं लहानपणीं प्रेम होतं का? लग्नाचं ठरलं होतं का?"

“ किरात आमच्या हिथं वारकरी म्हणून राहात असे. त्याचं माझं प्रेम होतं. अन् लग्नाचंहि ठरलं होतं ही गोष्ट खरी. ”

“ अजून त्याचं तुमचं प्रेम आहे कां ? ”

“ लग्नाचं ठरलं अन् त्यानं उलट मला त्रास द्यायला सुरुवात केली. आम्हां दोघांचं लग्नाचं ठरलं आहे, अशीं त्यानं सगळयांना पत्र धाडलीं, जाहिराती लावल्यान्. शेवटीं डॉक्टरणीकडून मला तपासून पाहण्यापर्यंत माझी विटंबना झाली. लग्नानंतरहि त्यानं हाच क्रम चालविलान्. माझ्या संसाराची राखरांगोळी व्हायला विलासांचा चमत्कारिक आणि संशयी स्वभाव कारण तर खराच; परंतु किराताच्या कारस्थानामुळंच हे सगळं संकट माझ्यावर ओढवलं आहे. आतां त्याच्याबद्दल प्रेम वाटणं शक्य आहे का ? आणि आता तर काय तो विलासांना जाऊन मिळाला आहे. शत्रूचा झाला आहे. ”

“ असं ? ”

“ त्याची निराशा झाली त्याचा सूड घेतो आहे माझ्यावर. आणखीन मनांत येतं कीं असल्या माणसाशीं लग्न नाही झालं तें बरंच झालं एकापरी. ”

“ निराशेच्या पोटीं मत्सर जन्माला येतो. उषाला तुमच्या सवतीला असंच वाटत असलं पाहिजे माझ्याबद्दल. तिचे वडील मला उषेसाठीं सांगून आले होते, पण आमच्या वडिलांनीं उषेबद्दल कांहीं गोष्टी ऐकल्या होत्या म्हणून त्यांनीं नाहीं म्हटलं. तो राग तिचा अजून असावा. ”

“ अन् शोभाताईचा सुद्धां आपल्या दोघांवर राग आहे. ”

“ होय. त्यांना वाटलं होतं. मी त्यांच्याशीं पुनर्विवाह लावीन. ”

“ ठरलं होतं ना एकदां त्यांच्याशीं ? ”

“ छेः ! ”

“ नाहीं. त्या मला म्हणत होत्या कीं पुरुषांचे स्वभाव असे असतात पुनर्विवाहाचे एकदां ठरवलं सुद्धां होतं, पण तुम्ही आल्यापासून बदललं. ”

“ काय म्हणावं त्यांना ! मी सर्वांशींच-बायका पुरुष असो—हांसून खेळून बरोबरींच्या नात्यानं वागतों, त्याचा त्यांनीं भलताच अर्थ केला. त्यांचीं माझी ह्या बाबतींत केव्हांच बोलणीं झाली नाहींत इतकंच काय, पण महात्माजींनीं सांगेतोवर लग्नाची बाब माझ्या मनांत सुद्धां कधीं आली नव्हती. ”

" कसे गैरसमज होतात पहा ! "

" अचला, समजा मी तुमच्याशीं लग्न करायला तयार झालों तर ? "

" माझं येवढं भाग्य कुठं आहे ? "

अचलेचा हात जयपालनें आपल्या उजव्या हातांत धरला. अचला हात न सोडतां जयपालकडे सरकत गेली आणि त्याला चिकटून बसली. तिचा हात लटलट कांपत होता, सर्वांगाला कांपरे भरलें होतें.

" भ्यालीस कशानं एवढी ? माझ्यापासून सुख लागणार नाहीं असं वाटलं होय ?"

सभोंवार चागला अंधार पडला होता. अचलेला भोंवतालच्या अंधाराची भीति वाटत होती, त्याहिपेक्षां पुढें ओढवणाऱ्या संकटाच्या घनघोर अंःधकाराची तिला जास्त भीती वाटत होती. ती जयपालला जास्तच बिलगली.

" मी भ्याले ह्यासाठीं, कीं माझ्या सुखासाठीं मी आपल्याला आज प्राणांतिक संकटांत ओढलं. सुखासाठीं येवढी धडपड करून दुःखाच्या खाईत तर उड्या घेत नाहीं ना आपण ! "

तिचें वाक्य पुरे होतांच रडल्यासारखें ओरडणें ऐकूं आले. अचला अधिकच भेदरली आणि म्हणाली " अन् हा रडल्यासारखा आवाज कुठला बरं आला ? "

" स्वतःची फजीती झाली म्हणून रूढी रडली असेल ? "

" चांगल्या माणसांच्या हांतून भयंकर चूक होत आहे म्हणून दशदिशा तर नसतील ना रडत ? "

"वेडी कुठली ! हें कोल्ह्याचं ओरडणं ! कोल्हेकुई म्हणतात ती हीच. कोल्हेकुईला काय भितेस ? "

" खऱ्या कोल्ह्यांच्या कोल्हेकुईला मी कशाला भिऊं ? पण समाज कोल्हेकुई करूं लागला कीं भीति वाटते. नुसती कोल्हेकुई करून समाज थांबत नाहीं. तर तो त्या व्यक्तीची लांडगेतोडहि करतो.

" चला आपण बापूजींच्या संध्याकाळच्या भजनाला जाऊं. आज रात्रीं महात्माजी परत वर्ध्याला जाणार आहेत. दुष्ट स्वप्न पडलं म्हणजे देवदर्शन करतात. आपण महात्माजींचं दर्शन घेऊं. "

---

# १०

"वाच ! ही नोटीस वाच." असें म्हणून विलासानें एका पाकिटांत हातांतले कागद कसेबसे कोंबून तें पाकीट उषेच्या अंगावर फेंकीत म्हटलें. आणि जागेवरून उठून खोलींत खेपा घालूं लागला.

उषेनें पाकीटांतले पत्र काढलें व ती तें वाचूं लागली.

रा. रा. विलास यास

अचला, हिचेकडून नोटीस देण्यांत येते कीं, तुमच्याशी माझें लग्न झाले. पुढें तुम्ही माझा अनन्वित छळ केला, निर्दयपणानें अनेक प्रकारचे जुलूम आणि मारहाण केलीत. माझ्यानंतर लग्नाची दुसरी बायको करून आणलीत आणि मला तुम्ही घरांतून घालवून दिलें. त्यानंतर माझ्या पोटगीचा तुम्ही कांहींच बंदोबस्त करीत नाही आणि परोपरीनें छळीत आहांत. अशा स्थितींत तुमचेमाझे आतां नवरा बायको म्हणून एकत्रांत राहणं शक्य नाहीं. आणि आज तारखेपासून तुमचा माझा नवराबायकोचा संबंध सुटला आहे. यापुढे माझी मी मनाला येईल तशी वागेन, वाटेल तिथें आणि वाटेल त्याच्याशीं राहीन, त्याच्याशीं पुनः लग्नहि करीन. हें तुम्हास नोटीसीनें कळवीत आहे. तरी त्याबद्दल जर तुमची कांहीं हरकत असेल तर ताबडतोब कळवावी. आणि तशी जर कांहीं हरकत आली नाहीं तर तुमची संमत्ती मानीन. कळावे.–अचला

उषेनें पत्राची घडी करून पुनः तें पाकीटांत कोंबलें आणि म्हणाली,

"कुठे काळे करून, एकदाच्या बया निर्वतल्या म्हणजे पाप फिटेल. कर म्हणावं. खुश्शाल गांवच्या महाराशीं का लग्न करीना ! हिथे गावांत नको."

"मी पहिला नवरा जिवंत असतांना बिशाद काय तिला दुसरं लग्न लावतां येईल ! मी कधींच संमति द्यायचा नाहीं."

"संमति देऊं नका. पण गप्प बसलात तर काय बिघडतं ?"

"मी गप्प बसलों अन् तिनं दुसऱ्याशीं लग्न केलं तर मग ?"

"केलन् तर केलन् ! तुम्ही तिला टाकून दिलीत तर आतां ती दुसऱ्याशीं लग्न करो कीं कुणाचीं ठेवलेली म्हणून राहो. आपल्या गावांत जर ती आली नाहीं तर, करीना वाटेल ते तिकडच्या तिकडे ?"

"छेः ! छेः !! जे धर्मशास्त्राला मान्य नाहीं, कायद्यानं होऊ शकत नाहीं, ते होऊ देणं हें बरोबर नाहीं. आपली संस्कृती, आपला धर्म, ह्याचा विचार नको का करायला ?"

"पुरे ! आपला धर्म किती पाळता तें दिसतंच आहे !—खाणं पिणं वागणं हे सगळं आपलं धर्मशास्त्राला संमतच असेल नाहीं ? उदार मताचे तुम्ही म्हणवता तर मी विचारते, अचला हीच जर समजा इंग्रजबाई असती तर तिनं काय केलं असतं ?"

"त्याचं आपल्याला काय ! तिनं घटस्फोट घेतला असता, नंतर तिला लग्न करतां आलं असतं. पण हिंदु कायद्याप्रमाणं घटस्फोट मान्य नाहीं."

"नसेल मान्य ! पण तिनं दुसऱ्याशीं लग्न केलं तर काय होईल ?"

"तिला कायद्यानं शिक्षा होईल."

"अन् समजा लग्न न लावता तशीच ती कुणाजवळ राह्यली तर काय होईल ?"

"त्या पुरुषाला शिक्षा होईल."

"आपोआप होईल शिक्षा ? का कुणी फिर्याद केली पाहिजे ?"

"आपोआप कशी होईल ? मीच फिर्याद केली तर शिक्षा होईल. मी गप्प बसलों, तर त्यांचं कुणी कांहींच पारिपत्य करूं शकणार नाहीं आपोआप शिक्षा झाली असती ना तर मला कांहींच पंचाईत नव्हती."

"आणि आतां तरी काय पंचाईत पडली आहे ? समजा ती ज्या

पुरुषाजवळ राहील त्याला तुम्ही तुरुंगांत पाठविलंत. मग त्यानं काय होणार ? "

" ती ताळयावर येईल. "

" ताळयावर आणून काय करणार आहांत तिचं ? "

" त्याची तुला पंचाईत ? "

" मी समजले. तिला घरांत आणायची असेल पुनः राह्यला ! तुम्ही असं नका समजूं कीं ही बाई माणूस आहे, हिला काय कायदा समजतों ? मी चांगला वकीलाचा सल्ला घेऊन आली आहे. तुमचा व्यापारधंदा माझ्या पैशावर चालला आहे, मालकीण मी आहे. तिला घरांत आणाल तर तुम्हां दोघांनाहि घराबाहेर जावं लागेल. समजलात ? "

" अस्सं ? तिनं दुसऱ्याशीं लग्न लावावं, नाहींतर तसंच दुसऱ्याबरोबर राहवं हे तरी तूं कांहीं चांगल्या हेतूनं किंवा तिची दया येऊन कांहीं म्हटलं नव्हतंस ! सवत कुठून तरी वाटेंतून दूर व्हावी एवढ्यासाठींच तूं मला म्हणत होतीस. "

" अचला तर बोलूनचालून माझी सवत. ती मला दृष्टीसमोरसुद्धां नको असली तर काय नवल ! पण तुम्ही तर तिच्याशीं लग्न केलं आहेत ना ! तिच्याबद्दल जे आज तुम्हांला वाटतं तेंच माझ्याबद्दलहि उद्यां वाटणार नाहीं कशावरून ! मी मत्सरानं बोलते, कबूल करते. पण तुम्ही बोलता ते केवळ नीच हेतूनं. अचला सुरेख आहे माझ्यापेक्षां. ती हावी आहे, दुसरं काय ? "

" अचलेवर मी पुरा सूड उगविणार आहे. रस्त्यांतून भीक मागतांना ती फिरेल, भुकेवांचून तडफडून मरेल, तिला व्याधी होऊन तिचे हातपाय झडतील, हे जेव्हां मी डोळयांनीं पाहीन तेव्हां माझा आत्मा शांत होईल. "

" धन्य त्या आत्म्याची ! खरंच धन्य !! लग्नाच्या बायकोबद्दल हें असलं प्रेम पाह्यलं ना म्हणजे मला तर जास्तच भीति वाटूं लागते. तरी बरं वडीलांनीं चांगले माझ्या नांवाचे कर्जरोखे लिहून घेतले अन् मग पैसे दिले. मी सांगते, तसंच झालं पाहिजे. ह्या पत्राचं कांहींसुद्धां उत्तर द्यायचं नाहीं. लग्न केलंच तरी फिर्याद करायची नाहीं, कुणाबरोबर राहिली तरी फिर्याद करावयाची नाहीं. "

विलास संतापानें लाल झाला. उषा अधिकाराच्या आवाजांत त्याला हुकूम करून निघून गेली हे पाहून तर त्याचा राग अनिवार झाला. त्यानें कोट टोपी चढविली आणि गाडी घेऊन एकटाच बाहेर पडला, तो तडक किराताकडे येण्यास निघाला.

किराताकडे शोभा ह्या पूर्वीं बराच वेळ येऊन वाटाघाट करीत बसली होती.

“ जयपाल सुटले असतील नाही कां ह्या वेळपर्यंत ? विलासानं फारच दुष्टपणा केला नाहीं. ? ”

“ होय तर ? आपली बायको पळवून नेणाराला बर्षासन बांधून देण्याऐवजी बेस्यानं त्याला कैदेंत घातलंन्. महान् दुष्ट. ”

“ आपल्या बायकोची वास्तपुस्त न करणाऱ्या नवऱ्याला तिच्या शीलाची येवढी किंमत असते हे मी आज प्रथमच पाहते आहे. नुसता सूड उगाविण्यासाठीं त्यानं जयपालाला कैदेंत टाकलं. ”

“ सूड अन् तो कां ? ”

“ अचलेला त्यांनी थारा दिला, तिच्यासाठीं ते भांडतात तेव्हां त्यांच्यावर सूड घेण्यासाठीं हे सगळं नाटक केलन्. ”

“ हो ! खरंच मी विसरलों. कीं जयपालाला तुरुंगांत जावं लागलं. ! ”

“ अन् हे सुद्धां तुम्ही केवळ सूडाच्या भावनेनं बोलतांहा. ”

“ मी अन् सूडाच्या भावनेनं अन् जयपालाबद्दल बोलतो म्हणतां ? ”

“ होय होय ! जयपालाचा जिकडे तिकडे येवढा बोलबाला होतो आहे. सगळ्या बायका त्याला आपला खरा पाठिराखा म्हणून मान देतात. अन् तुम्ही खुद्द स्त्रियांच्यासाठीं म्हणून मारे मासिक चालवितां तर अब्रू अशी कमावलीत कीं ह्या रस्त्यानं बायकांनीं जाण्यायेण्याचं सुद्धां टाकून दिलं. तो मोठा झाला, तुम्ही हलके ठरलांत ह्याबद्दल तुमच्या मनांत हेवा वाटतो आहे. ”

“ आतां बोलणंच संपलं ? ”

“ अन अचलेवरहि सुड घेण्यासाठीं तुम्ही संधी पाहताहा. मला माहिती नाहीं असं नका समजूं. लहान पोरगी असतांना तिनं लग्नाची वचनं काय दिली अन् त्या गोष्टीचा डांगोरा पिटून तिच्या जन्माचं वाटोळं केलंत, आणखीन अजूनहि ती मिळविण्याची धडपड. ”

" सपशेल खोटं. "

" तुम्ही तिला म्हणून लिहिलेलं पत्र माझ्या हातांत आहे. वाटलं तर आतां घेऊन येते. शीः ! वाटेल तसला घाणेरडा मजकूर त्यांत लिहिला आहेत. "

" बरं चला ! परमेश्वर करो आणि तूंहि जयपालावर अन् अचलेवर सूड सूड म्हणून तुटून पडण्याची वेळ न येवो. "

" माझं मी पाहून घेईन. पण तुमचीं नाटकं पाह्यलीं म्हणजे तिरस्कार येतो. जयपालाची सुटका करतो असं सांगून माझ्याकडून पैसे घेऊन गेलांत, आणखीन तिथं जाऊन कांही तरी भलतंच बोलतात ! अचलेला तुरुंगांत सुद्धा वाटेल तसली घाणेरडी मागणी घातलीत किं हो ! काय म्हणायचं माणसाला ? "

" तुला कुणी सांगितलं ? "

" वाटेल त्यांनीं सांगितलं ? जयपालांचं स्वतःचं पत्र आलं आहे. "

" सपशेल खोटं ! "

" अगदीं सपशेल खोटं बोलतां आहांत तुम्ही ! आतां येणारच आहेत दोघेजण. रुजुवात करून देते. "

इतक्यांत दारावर टक्टक् आवाज ऐकूं आला, दार उघडतात तों विलास आंत आला.

" माफ करा हां ! शोभाबाई मला माहीत नव्हतं तुम्ही गोष्टी बोलत बसला असाल. किरात मी एका तांतडीच्या कामासाठीं भेटायला आलों होतों." विलास म्हणाला, त्यानें हातांतलें पाकीट किरातच्या हातांत दिलें. तो तें वाचूं लागला.

" नाहीं कांहीं ! वायफळ गप्पाच चालल्या होत्या आमच्या. किरात मी जाते. " असें म्हणून शोभा उठली व जाऊं लागली.

"शोभाबाई ! तुम्ही बसा." विलासानें कागद पुनः वाचला आणि पाकिटांत घालतांना शोभेस विचारलें. " तुम्ही काय म्हणालांत मघाशीं ? जयपाल केव्हां येणार आहेत म्हणालांत ? "

" जयपालांची आई फार आजारी आहे, तिला भेटण्यासाठीं ते येणार आहेत. " शोभेनें उत्तर दिलें.

" आणखीन् अचला येणार आहे कां बरोबर ?" किरातनें विचारलें.

" होय तीहि येणार आहे. बरं मी जाते. तुमचं त्यांचं काम आहे." शोभा उठून उभी राहिली.

" शोभाताई, तुमचा माझ्यावरचा रोष अजून कमी झालेला नाहीं. माझा त्यांत कांहींच दोष नव्हता. असले खटले हे पोलीसच करतात." विलास म्हणाला.

" नाहीं तुमच्यासारखे लोक पोलीसांच्या पाठीमागें दडून खटले भरवितात. तुम्हाला येवढं तरी समजायला पाहिजे होतं, कीं टाकून दिलेल्या बायकोवर सूड उगवायचा तर तिला थारा देणाऱ्यांवर सुद्धां वैर उगवायचं कारण नव्हतं ?" शोभानें मनी बॅग सांवरून घेतली. " मी जाते बरं कां किरात." असें म्हणून शोभा निघून गेली.

" विलास जाऊ द्याहो ! शोभेला ती कसली आली आहे अब्रू ! बाई माणूस आहे म्हणून ऐकून घ्यावं झालं ! हा जयपाल इकडे येतो आहे अन् अचलाहि इकडे येत आहे, ह्याचा न् ह्या तुम्हाला आलेल्या नोटीशीचा मेळ घालतां, मला तर कांहीं निराळीच दिसती आहे भानगड ?"

" काय वाटतं तुम्हाला !"

" वाटतं कशाला ! मला आजच कुणीसं सांगत होतं कीं जयपालाचा अचलेशीं प्रीतिविवाह झाला आहे. तो माणूस हजर होता त्या सोहळयाच्या वेळेस."

" काय म्हणतां ! तिनं जयपालशीं लग्न केलंन् ! मग तर तिला तुरुंगांतच सीधी पाठवितो."

" विलास ! असे एकदम उसळूं नका. बोलून चालून तो प्रीतिविवाह. तो शाबित करतां येईल कां तुम्हाला ? त्यापेक्षां जयपालावर व्यभिचाराबद्दल फिर्याद मांडा. जाईल खडी फोडायला पांच वर्षं ! अन् पाहतां येईल अचला मग कुणाच्या जिवावर उड्या मारते ती !"

" असं ! व्यभिचाराबद्दल जयपालावरच फिर्याद करायची असं म्हणतां !"

" अहो, ते शाबित करणं सोपं जाईल ?"

" पण फिर्याद मलाच करावी लागेल नाहीं ?"

" मग काय मी कां करणार! कीं माझ्या लग्नाच्या बायकोशीं जयपालाचा वाईट संबंध आहे म्हणून ? "

" तसं नाहीं पण मी फिर्याद केलेली उषेला आवडणार नाहीं. "

" उषेला विचारण्याचं कारण काय! उषेच्या नवऱ्यानं असं कांहीं केलं असतं ना, म्हणजे तिला समजलं असतं, कीं मत्सर म्हणजे काय चीज असते ती. "

" तिला विचारण्याचं कारण नाहीं म्हणा पण आपलं विचारून ठेवलं. "

" मग काय फिर्याद करायची ठरवली! सांगा आतां आपण वकीलाकडे जाऊं. पुरावे कसे तयार करायचे ते ठरवूं. असा फास टाकूं कीं जयपाल त्याला अडकून लटकलाच पाहिजे. "

" बरं. चला आपण आत्तांच जाऊं. "



# ११

अचलेचें व जयपालचें लग्न झाल्याची बातमी सर्व वर्तमानपत्रांतून उभयतांच्या फोटोसह प्रसिद्ध होतांच एकच खळबळ उडाली. पुरोगामी मंडळींनी अभिनंदनांच्या संदेशांचा वर्षाव केला, तर नुसत्या सनातन्यांनींच नव्हे तर कायदा म्हटला म्हणजे तो ब्रह्मवाक्य अशा मनोरचनेच्या पकडींत सांपडलेल्या शिकलेल्यांनीं ह्या असल्या लोकविलक्षण लग्नावर निषेधाची लाखोली वाहिली. जिचा पहिला नवरा हयात आहे, अशा पांढरपेशा जातींतील एका स्त्रीनें दुसऱ्या पुरुषाबरोबर पुन्हां लग्न केल्याचा आणि वर्तमानपत्राच्या आणि सार्वजनिक चर्चेच्या फडांत उतरलेला हाच पहिला दाखला असल्यामुळें, त्याबद्दल जास्त वाच्यता होऊं लागली, कां जयपाल आणि विलास ह्या कमीअधिक प्रमाणांत प्रसिद्धी पावलेल्या व्यक्तींचा त्यांत संबंध येऊन पोहोंचला असल्यानें त्याची विशेष चर्चा होऊं लागली ह्याचा निर्णय देतां येणें शक्य नव्हतें. येवढें खरें कीं सर्व कारणें एकत्र होऊन 'न भूतो न भविष्यति' अशी त्या विवाहानें खळबळ उडवून दिली. कित्येक वेळीं एकाद्या चांगल्या गोष्टीचीहि झालेली अमर्याद प्रसिद्धी तिला विघातक ठरतें. त्यांतून हें चमत्कारिक लग्न सर्वस्वी लोकविरुद्ध; तथापि त्याला जर प्रसिद्धीच्या चव्हाट्यावर आणण्याचें टाळतां आलें असतें तर खात्रीनें त्याचें माकडखट झालें नसतें, कदाचित् अप्रसिद्धीच्या निवाऱ्यांत अचलाजयपालांना सुखानें संसारहि करतां आला असता. जयपालनें आपणहून प्रसिद्धीला आव्हान दिलें नव्हतें हे खरें असलें,

तरी तो एका तत्वाकरितां हें लग्न करीत असल्यामुळें त्या लग्नाची प्रसिद्धी होत असतांना तो मुळींच गांगरला नव्हता. सामाजिक अन्यायी कायद्यांचा कायदे-भंगाच्या चळवळीचें त्यानें निशाण उभारलें होतें, अन्यायी कायद्याच्या विरुद्ध सर्वत्र पसरलेली सामाजिक क्रांतीची सर्व कुमक येऊन आपल्याला मिळेल अशी त्याला भारी आशा वाटत होती, आणि मिळालेली प्रसिद्धी त्याला कार्याच्या दृष्टीनें हावीच होती.

पण विलास–उषा ह्यांच्या राहत्या गांवांत हीं दोघें वावरूं लागतांच विलास–उषा ह्यांची बेफिकीरी वृत्ती एकदम पार मावळली. शोभा किरात ह्यांच्याहि मनांत भलतीच उलथापालथ झाली.

कायद्याची सल्ला घेण्यांत आली. पहिला नवरा जिवंत असतांना दुसऱ्या पुरुषाशीं लग्न केल्याबद्दलच्या गुन्ह्याबद्दल अचलेला सात वर्षांची शिक्षा होईल. जिचा पहिला नवरा जिवंत आहे अशा स्त्रीशीं संबंध केल्याच्या आरोपावरून पांच वर्षांची शिक्षा होईल, असे वकिलांचे अभिप्राय पडले.

विलास जयपालाच्या विरुद्ध फिर्याद करणार ह्याची कुणकुण लागतांच शोभा पूर्वीचा रोष विसरून उषेकडे गेली आणि म्हणाली,

"उषाबाई, पूर्वीच्या सगळ्या गोष्टी विसरा. मीहि विसरते, तुम्हीहि विसरा. विलासांना सोडून देऊन एकट्या अचलेवर खटला भरतां येईल. तिला कोर्ट शिक्षा देईल. अनायसे तुमच्या न् माझ्या वाटेंतला कांटा जाईल."

"ही बया ह्याच गावांत आली नसती ना राहिला तर, मी ह्यांना कुणाच्याच विरुद्ध खटला भरूं दिला नसता. मी तर एवढ्याला सुद्धां कबूल होते कीं, ह्यांनीं खुश्शाल दुसऱ्या कुठल्या तरी गांवीं एकत्र राहवं. सवत म्हणजे खिरींतला सराटा. उद्यां हे तिच्याजवळ जाऊन राहूं लागले तर मला कांहीं हरकत घेता येईल कां! लोक म्हणतील अचला चांगली जर लग्नाची बायको आहे तर काय हरकत आहे?"

"आणि माझ्या अन्नांत माती कालवायला अचलेनं कांहीं कमी केलं नाहीं! तुम्ही सगळा इतिहास जाणीतच आहांत. पण बायकांचं मन राहात नाहीं. बघा मला राहवलं नाहीं म्हणून मुठींत नाक धरून शरण आले तुम्हा दोघांना! कीं कसंहि करा अन् जयपालाला शिक्षा होईल असं नका करूं.

त्यांच्यावर केवढाली सार्वजनिक कामं अवलंबून आहेत. आणखीन् उघड बोलते माझंहि नशीब अवलंबून आहे."

"त्यांच्याशीं अजूनहि तुम्ही लग्न लावाल!"

"न लावायला काय हरकत आहे? माझं तरी हें दुसरं लग्न आहे ना?"

"पण अचला जिवंत आहे. तुम्हाला मी आपली अनुभवाची गोष्ट सांगते. पुरुषाची पहिली बायको जिवंत असली तर सवतीवर कधींसुद्धां लग्न करूं नये. सारखी धास्ती असते मनांत! आणखीन पुरुषांनीं वरून वाटेल येवढं दुसरीबद्दल प्रेम दाखवलं तरी पहिलीबद्दल त्यांच्या मनांत विचार मुळींच येत नसतील असं थोडंच! त्यांतून पुरुषाचं प्रेम. दुसरी बाई त्यानं पाह्यली नाहीं तोंवर तो आपल्या ताब्यांत! अन् लग्नाची पहिली बायको चांगली जिवंत असली तर तिच्याकडे आजना उद्यां तो गेल्याशिवाय राहील कां! आणखीन आपण तरी कुठल्या तोंडानं नका जाऊं म्हणून म्हणणार?"

"आतां सगळंच कसं साधणार! तुमच्या वडीलांजवळ येवढा पैसा होता तरी तुम्हांला सवतीवर त्यांनीं दिलीच ना! माझ्या सारखींच तर काय सगळंच वाहवलेलं! जेवढं त्यांतलं पदरीं पडेल तेवढं पदरांत पाडून घ्यावयाचं. अन् तुमच्या लक्षांत आलं नाहीं. अहो अचलेला शिक्षा झाली म्हणजे मग ती आपोआप वांटेतली नाहीशीं नाहीं का व्हायची! म्हणून तर सांगायला आले आहे कीं अचलेवर खटला करा."

"बघा बाई! तुम्हीच सांगा! मी तर सांगून सांगून कंटाळले. पाहिजे तर चला तिकडेच. आतां आलेच आहेत."

"बरं." शोभा म्हणाली.

उषा आणि शोभा ह्या दोघीजणी विलासांच्या खोलींत गेल्या. विलासानें दोघींचेही म्हणणें ऐकून घेतलें आणि शोभेला म्हटलें.

"शोभाबाई! तुम्ही म्हणता त्याला माझी ना नाहीं. पण एका अटीवर मी जयपालाला सोडून देईन. त्यानें माझी माफी मागावी, चूक झाली असं म्हणावं. मी खटला भरला तरी मला केव्हांहि काढून घेतां येईल. अजून तो घमेंडीत असेल कीं महात्माजींनीं आमच्या लग्नाला आशिर्वाद दिला आहे तर कोर्ट काय करणार!"

" ते माझ्याकडे लागलं. "

इतक्यांत किरात आला. शोभा आणि उषा तेथून उठून दुसरीकडे गेल्या.

" विलास, वकीलांचं म्हणणं पडलं कीं एकट्या जयपालवरच व्यभिचाराच्या आरोपाखालीं खटला भरावा. त्यानं लग्न झाल्याची तक्रार केली तरी तो कांहीं त्यामुळं गुन्ह्यांतून सुटणार नाहीं. "

" अन् अचलेविरुद्ध ? "

" अचलेविरुद्ध समजा तुम्ही खटला भरला, तरी लग्नाचा पुरावा कोण द्यायला येणार ! बोलून चालून दुसरें लग्न म्हणजे गुन्हाईत कृत्य ! त्यांत आपण भाग घेतला होता असं सांगायला कुणी येईल कां ? "

" पण, तुम्ही एक विसरतां ! जयपाल स्वतःच लग्न केल्याचं कबूल करील, अचलाहि कबूल करील. "

" बघा बुवा ! वकीलांचं म्हणणं आहे, कीं एकट्या जयपालावर खटला भरा. मीहि त्यांना होय म्हणून सांगून आलों आहे. अन् मी तुम्हांला आतांच सांगून टाकतों. "

" काय ? "

" कीं माझ्या मदतीची जरूरी जर तुम्हांला वाटत असेल तर मी सांगेन तसं वागलं पाहिजे. नाहीं तर असं व्हायचं, कीं मी मोठमोठ्या अमलदारांना भेटून कांहीं एक गोष्ट नक्की करावी अन् तुम्ही दुसरीच करावी, तसं न व्हावं. त्यांत माझी अन् तुमची दोघांची किंमत जाईल अन् शेवटीं काम बिघडेल. "

" नाहीं. उषाचा आग्रह आहे कीं अचलेवरच खटला भरा. "

" अन् समजा, अचलेवरच खटला भरला, तिला शिक्षा झाली, तर त्यांत तुम्ही काय मिळवलंत ! "

" अचलेवर पुरेपुर सूड उगवल्याचा आनंद, दुसरं काय ? "

" अन् तुमच्या बायकोशीं व्यभिचार करणाऱ्या जयपालाला मोकळा ठेवलांत म्हणजे तो तुमच्यावर सूड उगवील तो ? "

" मग तर दोघांच्या विरुद्ध खटले भरूं ? "

" पुनः तेंच आणलंत ? वकीलाचं ऐकायचं आहे कां उषाताईचं ऐकायचं

आहे ह्या कोर्टकचेऱ्यांच्या कामांत ? वकील जर स्पष्ट म्हणतात कीं जयपालावर खटला भरा, तरी तुमचा हा हट्ट कां ! ”

“ बरं पाहतो मी. तुम्ही पुढें व्हा. मी जरा दुकानांतून जाऊन येतो. ”

किरात एका दारानें गेला, दुसऱ्या दारानें उषा आंत आली. शोभा आंतल्या बाजूसच उभी राहीली.

“ किरात काय सांगत होते ! ”

“ जयपालावर खटला भरा म्हणून ! ”

“ आणखीन् अचलेविरुद्ध खटला भरायचा आहे ना ? ”

“ तूर्त नको. ”

“ मग जयपालाविरुद्धहि सध्यां नको. ”

“ छेः ! माझ्या अब्रूवर डांबर कुणी फासलं असेल तर तें अचलेनं. ती अशी निघाली म्हणून तर ह्या थराला गोष्टी आल्या ना ! कांहीं जगाच्या विरहित हीलाच टाकून दिलेली आहे असं थोडंच ! किती तरी बायकांना नवऱ्यांनीं टाकून दिलेल्या असतात. पण त्या आपल्या नीट राहातात; नवऱ्याची अब्रू संभाळतात. ”

“ हिच्यावर सूड घ्यायचा कां जयपालावरहि. ”

“ प्रथम जयपालावर मी सूड घेणार. आपल्या बायकोशीं संबंध ठेवणाऱ्या पुरुषांबद्दल नवऱ्याला काय वाटतं ते तुला नाहीं समजणार ! त्याच्या नरडीचा घोंट घ्यावासा वाटतो. ”

“ अहो, पण ज्या बायकोला तुम्ही टाकून घालवून दिलीत ती तुमची बायको तरी राहतें कां ! अन् मग तिला दया दाखविण्याचं काय कारण ? मला ह्याचं उत्तर पाहिजे आहे. ”

“ उत्तर मला विचारूं नकोस ! सूड हें एकच उत्तर ! ”

“ पण तिच्यावर सूड घ्या ना ! ”

“ तिच्या प्रियकराला तुरुंगांत डांबून तिची आणि त्याची ताटातूट करणं, हाहि सूडच उगविणं आहे. समजलीस ? ”

“ एक तुरुंगांत गेला तर ती दुसरा शोधून काढील. मग ? ”

“ पाहीन मग ! किरात सांगेल तसं वागायचं आहे मला. ”

" मग तर बोलणंच राह्यलं नाहीं."

उत्तर न देतां विलास घरांतून लगबगीनें बाहेर पडला. बाहेर उभ्या असलेल्या मोटारींतून तो निघून गेला.

शोभा मागच्यापावलीं निघून गेली.

जयपालावर अचलेशीं व्यभिचार केल्याच्या गुन्ह्याबद्दल विलासानें खटला भरला. अर्थात् जयपाल जामिनावर सुटे होते. लग्नाच्या बातमीनें जेवढी खळबळ उडाली नव्हती तेवढी ह्या खटल्याच्या बातमीनें उडाली. त्या खटल्यांतून सामाजिक क्रांतीच्या तत्त्वांची कांहीं तरी यशस्वी शहानिशा होईल, ह्याबद्दल बहुतेकजण उदासीन होते. विलासांची गृहशोभा आणि जयपाला-सारख्याची विषयलालसा ह्यांची कांबळी कायद्याच्या कांट्यावर मनसोक्त फाटली जाईल ह्याच एका कुतूहलानें बहुजनसमाज त्या खटल्याकडे कानोसा देऊन उभा होता. खटला ऐकायला कचेरींत मनस्वी गर्दी झाली. जयपालचा विचार वकील द्यावयाचा नव्हता, कारण त्याचा बचाव वकीलांना पटेना आणि वकील सांगत तसला बचाव करण्याचें जयपालास मान्य होईना. शेवटीं मोठ्या मिनतवारीनें त्याच्या स्नेही वकीलानीं जयपालकडून वकीलपत्र कसेंबसें मिळ-विलें आणि खटल्यास सुरुवात झाली.

प्रथम फिर्यादी म्हणून विलासाची जबानी झाली त्यांत त्यानें सांगितलें कीं, अचला ही माझी लग्नाची बायको आहे ही गोष्ट जयपालास माहित अस-तांना, त्यानें तिच्याशीं दुसरें लग्न केलें आणि तीं दोघेजण नवराबायको म्हणून राहत आहेत. उलट तपासांत त्यानें सांगितलं कीं, अचलेला मारझोड करून आपण बऱ्याच वर्षांपूर्वी घरांतून काढून लावली असून तिच्या पोटापाण्याची आपण कांहीहि तजवीज करीत नाहीं. आपलं नवराबायकोचं नातं राहिलें नाहीं असें पूर्वीच्या फिर्यादींत झालेल्या जबानींत सांगितले होते. तिनें एक नोटीस दिली तिचे उत्तर आपण दिलें नाहीं वगैरे. ह्याशिवाय लग्नाला हजर असलेल्या एका साक्षिदाराची जबानी झाली; त्यांत त्यानें प्रीतिविवाह झाला तथापि विधी काय झाला ते माहित नाहीं असें सांगितलें. दुसऱ्या एका साक्षिदारानें सांगि-तलें, कीं अचला–जयपाल हे एकत्र राहतात. परंतु त्यांचे निजणें बसणें कसें होत असे ते माहित नाहीं, अचला जयपालांच्या आश्रयाला आज बरींच वर्षें

राहत आहे. एवढ्या जबान्या होऊन त्या दिवशींचें काम पुरें झालें. न्यायाधीशांनी उठतांना विलासांच्या वकीलाला सांगितलें.

"अचलेशीं आरोपीनें लग्न केलें आहे, असें तुम्ही म्हणतां पण त्याचा पुरावा कांहींच नाहीं. अन् आरोपीनं व्यभिचार केल्याचाहि पुरावा नाहीं. पूर्वीसुद्धां अशाच फिर्यादी तुमच्या पक्षकारानें केल्या होत्या असें त्यांनीं उलट तपासांत कबूल केलें आहे. मला तर हें कांहीं निराळंच दिसत आहे प्रकरण. आणखीन काय हो, मी असें विचारतों कीं, जर खरोखरीच अचलेनें ह्यांच्याशीं पुनः लग्न केलें असें तुमचें म्हणणें असेल तर अचलेविरुद्धहि कलम ४९४ खालीं तुम्ही कां खटला भरला नाहीं ?"

विलासाचे वकील—अचलेविरुद्ध खटला भरला असता तर अचलेची जबानी साक्षीदार म्हणून आम्हांला घेतां आली नसती. आम्ही तिची जबानी काढली आहे, शोभा म्हणून एक मास्तरीण आहेत त्यांचीहि जबानी आम्ही काढली आहे. आतां मी पुरावा दरखास्त देतों.

कोर्ट—अचलेची जबानी तुम्हांला घेतां येईल कीं नाहीं, मला शंका आहे. आणि अचला व्यभिचाराची गोष्ट कबूल करील कां ! लग्नाची गोष्ट कबूल करील कां !

वकील—लग्नाची गोष्ट खुद्द आरोपीलाही नाकबूल नाहीं. आपण विचारून पहा. जी गोष्ट आरोपीला कबूल आहे ती शाबित करण्याचा प्रश्नच उभा रहात नाहीं.

कोर्ट—हे बघा, आपण फौजदारी काम चालवीत आहांत. पक्षकारांच्या सांगण्यावरून गुन्हा शाबित मानता येणार नाहीं. आणखीण आरोपी हा येवढा मूढ आहे असं वाटतं तुम्हाला कीं तो लग्नाची गोष्ट कबूल करील ? काय हो (जयपालच्या वकीलाला उद्देशून) तुमचा बचाव काय आहे ?

जयपालचे वकील—कीं गुन्हा शाबीत होऊं शकत नाहीं.

कोर्ट—अन् लग्न केल्याबद्दलची काय ही हकीगत आहे !

जयपाल—(एकदम उठून म्हणाला) अचलेशीं मी लग्न केलें आहे, ती माझी लग्नाची बायको आहे म्हणून तिचा माझा नवराबायकोचा संबंध असून त्याला व्याभिचार म्हणतां यावयाचा नाहीं.

कोर्टः—आरोपी काय म्हणतो आहे तें मला समजलंच नाहीं.. ह्याचं डोकं तर फिरलं नाहीं ना! त्याची शहानिशा अगोदर केलेली बरी. तुम्ही म्हणत असाल तर, डॉक्टराकडे आपण तपासाला पाठवूं. जयपालासारख्यांनीं असलं बोलावं, हें मला वेडाचा परिणाम वाटतो. पहा, उद्यांपर्यंत विचार करा. आणि फिर्यादीच्या वकिलानाहि मी सांगतो कीं पुरावा आरोप ठेवण्याइतका सुद्धां वजनदार दिसत नाहीं.

त्या दिवशींचे कोर्टाचें काम संपलें, पक्षकार घरीं आले. न्यायाधिशांनीं उपस्थित केलेल्या प्रश्नांमुळें त्यांची एकच धांदल उडाली. अचला आणि शोभा ह्यांच्यावर साक्षीसमन्सें संध्याकाळच्या संध्याकाळीं बजावण्यांत आलीं. शोभाला घेऊन जाण्यासाठीं उषा गाडी घेऊन आली, आणि म्हणाली.

"शोभाबाई! तुम्ही ह्या वेळेला आमच्याकडची साक्ष दिली पाहिजे. आमचं नाक कापलं जाण्याची वेळ आली आहे."

"आणि माझं नाक तुम्ही कापलंत त्यावेळेला विचार केला होतात कां! तुमचं नाक कापलं तर चांगल्या मीठ मिरच्या भरायला मी येईन."

"पण तुमचा तरी फायदा होतो आहे कां त्यांत! पुष्कळ तुम्ही जयपालच्या पाठीमागं लागला आहांत, पण तो उगीच ढुंकून तरी पाहतो आहे कां तुमच्याकडे! अचलेनं त्याला पटकावलान् तरी तुमचा नाद अजून सुटत नाहीं. तो अजून इकडची माफी मागेल तर खटला काढून घेऊं. विचारा. अन् तें जर त्याला कबूल नसेल तर मग मात्र आमच्या बाजूची साक्ष तुम्ही दिली पाहिजे,"

"आतां कांहींच सांगत नाहीं. मी त्यांना विचारीन अगोदर अन् मग सांगेन. पण तुमच्याकडची साक्ष घ्यायची म्हणजे काय सांगायचं?"

"खरंच विचारणार आहेंत, खोटं आम्हांला नकोच आहे. हीं दोघंजण नवराबायकोसारखीं राहातात ना! येवढंच आम्हाला पाहिजे आहे."

"सगळं गांव जाणतं आहे! येवढं साधं सुद्धां कां जज्जाला कळू नये. अन् मग तो न्याय तरी कसला देणार?"

"आमचे वकील तुम्हाला सांगतील. आज तुम्ही जयपालांना विचारून

ठेवा. उद्या सकाळीं गाडी पाठवीन मी तुम्हांला वकीलांच्या हिथं घेऊन जायला."

"पाहीन, नक्की कांहीं सांगतां येत नाहीं."

उषा हिरमुसली होऊन परत गेली. शोभा खिन्न मुद्रेनें जयपालाकडे आली. अचला तिला पाहतांच खोलींत निघून गेली.

"या बसा! कांहीं कामासाठीं आलां आहांत?" जयपालनें विचारलें.

"अशाकरतां मी आल्यें आहे कीं, विलासांनीं माझी साक्ष काढली आहे उद्यां." शोभा म्हणाली.

"बरं; मग?"

"विचारायला आले आहे कीं मी काय सांगूं?"

"खरं असेल तें सांगा."

"अन् तसं सांगितल्यानं तुम्हाला जर शिक्षा होणार असेल तर?"

"असं बघा. मला शिक्षा ही खात्रीनं होणारच! आजचे अन्यायी कायदे जोंपर्यंत अमलांत आहेत तोंपर्यंत माझी शिक्षा कुणींच टाळूं शकणार नाहीं."

"कां बरं नाहीं! मी सांगते तसं तुम्ही जर ऐकलंत तर तुम्हांला मुळींच शिक्षा होणार नाहीं."

"असं? मी वकीली सोडल्याला बरींच वर्षें झालीं. कदाचित् मी कायदा विसरलोंहि असेन. ऐकूं द्या तर खरं तुमचं म्हणणं काय आहे तें?"

"कीं विलासाची तुम्ही माफी मागीतलीत, तर तो खटला काढून घेणार आहे."

"कशाबद्दल माफी?"

"आपल्या हातून चूक झाल्याबद्दल"

"कसली चूक?"

"अचलेशीं लग्न करण्याची आणखीन् तिच्याशीं बायको म्हणून संबंध ठेवण्याचीच तर!"

"मी त्याला चूक समजत नाहीं, माफी मागण्याचा प्रश्नच उरत नाहीं. मी हें सगळं तत्वासाठीं केलं आहे. तत्त्वाच्या दृष्टीनं त्यांत कांहींच चुकलं नाहीं."

" बरं येवढं तर कराल कां ! कीं अचलेशीं आपलं लग्न झालं नाहीं येवढं तरी सांगाल कां ? "

" पण तें कां म्हणून ? "

" मी सांगते म्हणून. "

" आणखीन अचलेची काय वाट ? "

" अशा टाकून दिलेल्या दहा बायकांची जी वाट असते, तीच हिची वाट. "

" आणि तसं करणंहि तत्त्वाच्या विरुद्ध होईल. मी तिच्याशीं लग्न लावलं, त्याच घटकेस मी तिची सर्व जबाबदारी शिरावर घेतली. आमचं लग्न कायद्यानं निषिद्ध असेल, पण आमचं आम्ही तरी त्याचं पावित्र्य संभाळलं पाहिजे. अचला ही माझी बायको आहे. तिच्या हिताविरुद्ध मी कांहींच करूं इच्छित नाहीं. "

" अचलेला तुम्ही तर अजूनहि बायको म्हणून मानता. अन् ह्यापुढें मानणार तर. "

" अलबत. जिवांत जीव असेल तोंपर्यंत मी तिला तशीच मानणार ! "

" तिच्यासाठीं शिक्षा झाली तरी सुद्धां तसंच मानणार कां ? "

" मला शिक्षा होणार हें नक्की असतांना जर मी जाणूनबुजून तिच्याशीं लग्न केलं तर आतां मला शिक्षेची का म्हणून भीती वाटावी ! मी हें सर्व अरिष्ट तत्त्वाकरितां ओढून घेतलं आहे. "

" आणि मी सुद्धां तत्त्वासाठींच गळ घालीत आहे तुम्हाला. "

" तत्त्वासाठीं ? कुठल्या बुवा ? "

" माझ्या तोंडून हजार वेळां ते न् तेंच वदवून घेण्यांत काय अर्थ आहे ? "

" शोभाबाई ! माझा नाइलाज आहे. मी जर अजाणपणं तुम्हाला तशी समजूत करून घेण्यासारखं उत्तेजन दिलं असेल तर मी माफी मागतो. ज्या ज्या वेळीं मी तुम्हांशीं किंवा दुसऱ्या अनेक भगिनींशीं मनमोकळेपणानें हांसलो बोललों असेन त्या त्या वेळीं दोनच हेतू मनांत ठेवलेले असत. बहिणीच्या निर्व्याज आनंदी संगतीचा लाभ व्हावा हा माझा एक स्वार्थी हेतु. आणि दुसरा

म्हणजे तुम्हांसारख्या दुर्दैवी दुःखीकष्टी भगिनीच्या आयुष्याला सात्विक स्नेहाच्या क्षणिक आनंदानें उजळा द्यावा. तुम्हांला माझ्याबद्दल किती आदर वाटतो, ते मला माहित नाहीं असं नका समजूं. पण विवेकानं तुम्ही आपल्या मनाला योग्य दर्जावर आणूं शकाल."

"माझ्या आशांचं ह्या अचलेनं स्मशान केलं, तुम्हालाहि दया येत नाहीं, मग मीच तरी कां सत्यनिष्ट राहवं ?"

"हा प्रश्न तुमचा आहे."

"तेवढें विचारण्याचा सुद्धां मला अधिकार नाहीं ना !"

"स्वतःच भलतीसलती कल्पना करून तुम्ही बोलत आहांत तोंवर मला दोन पावलें मागंच सरकलं पाहिजे."

"तुम्ही मागं सरकलात, तरी मी कशाला माघार घ्यावी ? आणि कुणासाठीं म्हणून ? जयपाल मागून मात्र मला नांवं ठेऊं नका."

"कशाबद्दल ?"

"म्हणाल कीं शोभानं माझ्यावर सूड उगवलान्, माझ्या विरुद्ध जबानी दिलीन्."

"छेः ! मी तसं कशाला म्हणू ? आणखीन तुम्हाला बजावतों, की तुम्ही माझ्यासाठीं म्हणून खोटी जबानी दिलीत तरी मी सुटण्याची आशा नको, सुटण्याची माझी इच्छाहि नाहीं. कायदेच ज्या दिवशीं बदलतील त्याच दिवशीं माझ्या ह्या कृत्याचा न्यायनिर्णय लागेल."

"आणि समजा तुम्ही म्हटलंत, कीं हिनं सूड घेतला तरी मला काय आतां त्याची पर्वा आहे ? दुसऱ्याच्या अन्नांत माती कालवायला निघलेल्या बाईला तरी उपासमारीच्या वेदना समजल्याच पाहिजेत. अचलेवर मी पुरा सूड उगवणार. मग दुसऱ्या कुणाला त्यांत त्रास भोगावा लागला तरी हरकत नाहीं."

इतकें बोलून शोभा घरांतून तणतणत बाहेर पडली. अचला आंतल्या खोलींत उभी राहून दोघांचा संवाद ऐकत होती. शोभा जातांच ती बाहेर आली आणि म्हणाली.

"शोभाबाई म्हणतात तशी विलासांची माफी मागायला कांहीं हरकत

नाहीं. माझं सुद्धां सांगणं असंच आहे. कीं माफीमागून हे प्रकरण संपवावं. "

" अचला, तूं सुद्धां असंच आतां म्हणूं लागलीस कां ? आपण लग्न कशा करिता केलं, हें तरी कांहीं लक्षांत घेशील कीं नाहीं ? "

" तुम्ही लग्नाची तयारी दाखविलीत, मी होय म्हणून म्हटलं त्यावेळेला असा हा प्रकार होईल, असं जर मला स्वप्न पडतं, तर मी कधींच तयार झालें नसतें. "

" पण आपण हे तत्वाकरितां लग्न केलंना ! "

" जिला आपण एकदा आपली म्हटली तिच्याशीं वाटेल तीं संकटं भोगण्याचं तत्व तुम्ही पाळलंत, खरं करून दाखवलंत. माझं तत्व मात्र मी पायदळी तुडवीत आहे. " अचलेनें डोळयाला पदर लावला.

" तुझं तत्त्व आणि माझं तत्त्व निराळं कां आहे ? " जयपालनें अचलेचे डोळे पुसतांना म्हटले.

" होय ! प्रेमाच्या माणसांना येवढासुद्धां त्रास होऊ द्यावयाचा नाहीं हें आम्हा बायकाचं तत्व. तुमच्यावर प्रणांतिक संकट निव्वळ माझ्यामुळें आणून मी आपलं तत्व पार मोडलं. "

" मग तर लग्नाला कशाला कबूल झालीस ! मी तुला बजाविलं नव्हतं का ! कीं आपल्याला अनेक संकटं सोसावीं लागतील. "

" होय ! पण आपली ताटातूट होईल असं कुठे माहित होतं ? "

" आणि तूं लग्नाला कबूल झालीस ? ती तर मग कशासाठीं ? "

" मी तोंडानं काय सांगूं ! आतां बरीक वाटतं, कीं एका मोठ्या माणसाच्या कर्तबगारीची धुळधाण आपण केवळ स्वार्थापायी केली. "

" स्वार्थ कसला ? "

" निव्वळ संसारकरावयाच्या तळमळीनं मी लग्नाला कबूल झाले. मला मिळालेली शिक्षा बस आहे. कुणा सतिसावित्रीचे तळतळाट मी मागल्या जन्मीं घेतले असतील म्हणून ह्याजन्मीं दैवानं माझ्या तोंडाला अशी पानं पुसली. मी पाया पडते. मला एक भिक्षा घाला. "

" अचले ! ऐन वेळेला तू अशी काय धीर सोडतेस ! कांहींतरी विचार कर; धीर धर. " जयपालानें अचलेच्या पाठीवरून हात फिरवला, त्यासरशीं

तिला जास्तच भडभडून आलें. तिनें जयपालच्या पायावर लोटांगण घातलं. " ऊठ; अचला ऊठून बैस " असें म्हणून जयपाल तिला बसविण्याचा प्रयत्न करूं लागला.

" मी सांगेन ती गोष्ट कबूल करीत असाल तर मी पाय सोडीन. "

" तुझ्यान् माझ्या हिताची कोणतीहि गोष्ट मी तात्काळ कबूल करीन. "

" बघा बरं ! मग विलासाची माफी मागून ह्या खटल्यांतून मोकळे व्हा. "

" ह्यानीं आपणांपैकी कुणाचंहि सुख साधणार नाहीं. "

कां बरं ! माझं सुख भरपूर साधेल. तुम्ही सुटलात म्हणजे मला काय कमी आहे ! मी जवळसुद्धां राहणार नाहीं. लांब कुठेतरी जाईन. "

" पण मात्र मी कर्तव्यापासून अशानं भ्रष्ट होईन. सत्याकरितां मी भांडलो, न्यायाकरितां मी झगडलों, आणि त्याचा शेवट तर काय कीं असत्य बोलायचं ! अन्याय शिरसावंद्य मानायचा ? पत्नी म्हणून तुझी सर्व जबाबदारी पत्करली, तर तुझ्यावरचें अधारछत्र मी काढून घेणं अधमपणाचं आहे. अचला, मी तुझी निर्भत्सना करीत नाहीं. तूं जरी अगर्वी वासनासाठीं लग्न केलं असलंस, तरी त्यांत मी तुला यत्किंचितहि दोष देत नाहीं. तुला निराळं अस्तित्व राह्यलं नाहीं. पतीच्या सत्कार्यात पत्नीनें सामील व्हावें, त्यासाटीं कष्ट सोसायला तयार व्हावें, हा पतिव्रता धर्म होय. उठ ! अचला मी तुझा नवरा म्हणून तुला अधिकारानं सांगतो आहे. ऊठ. रडणं आंवर ! ऐनवेळी अवसान घात करून मला अडचणींत टाकूं नकोस. असला विश्वासघात करणं हेंहि पातकच टरेल. "

अचला तेथून लगबगीनें उठली, आणि तोंड लपविण्यासाठीं आंत गेली, आणि तोंड धुऊन बाहेर आली आणि मळेंच हांसून म्हणाली. " मी मधाशीं भानावरच नव्हते. भलतंसलतंच बोलले नाहीं कां ! "

" संकट आलं कीं नवराबायकोनीं एक विचारानं त्याला तोंड दिलं पाहिजे. "

" उद्यां मला साक्षीत विचारलं तर काय सांगायचं ? "

" खरी हकीगत असेल तीच सांग ! आपल्याला खोटं बोलायचं नाहीं, खोटा बचाव करायचा नाहीं. "

" लग्न झाल्याचं सांगू ? "

" लग्न झाल्याचंच काय पण नवराबायको म्हणून राहत असल्याचंसुद्धां सांग. अन् मी आतां माझा जबाब लिहून काढतों. "

" बरं. "

त्या रात्रभर जयपाल जबाब लिहित बसला होता. लिहावें, पुनः फाडावें, असें त्याचें रात्रभर चालले होतें. अचला याच्या कामांत व्यत्यय येईल म्हणून मुद्दामच झोपेचें सोंग घेऊन जयपालाकडे पाहून डोळ्यांतून पाणी गाळीत पडून राहली होती. जयपालाचें लिहिणें थांबलें, बाहेर उजाडलें. अचलेनें लगबगीनें उठून जयपालाच्या पायावर डोके टेवले.

" हे काय हें ? " जयपालनें विचारलें.

" क्षमा करा. मला या पायांचं शेवटचं दर्शन घेऊं द्या. "

" वेडी तर नाहींस ना ! ह्या गुन्ह्याला जास्तींत जास्त पांच वर्षांची शिक्षा होईल. मी सुटून येईनच की ! "

" उद्यांचं कुणी पाह्यलं आहे ? आपण शेवटचेच भेटूं या. "

त्या दिवशीं शोभाची व अचलेची जबानी झाली. न्यायाधीशानीं व्यभिचाराचा आरोप ठेवला. व न्यायाधीश आरोपीच्या वकीलाला म्हणाले !

" अचलेशी लग्न करून आरोपी व ती, नवरा बायको म्हणून राहत होती असा निश्चित पुरावा, आणखीन तो मुद्दां अचलेचा आला आहे. मला वाटतं अचला आतां उलटून गेली आहे, आणखीन आरोपीच्या विरुद्ध जबानी देत आहे. म्हणून तिच्या जबानीवर कितपत विश्वास ठेवायचा तें तुम्ही बघा. आणखीन मला वाटतं तुमचा बचाव हाच असेल कीं ४९४ कलमांतल्या शब्दांत सांगितल्याप्रमाणें नवऱ्याच्या संमतीनं अगर त्यानें कानाडोळा केलेला हा संबंध होता. त्याबद्दलचा पुरावा केव्हां आणाल. मी आतां आरोपीचा जबाब घेतों.

कोर्ट—फिर्यादीची बायको अचला हिच्याशीं तूं व्यभिचार करून ४९४ कलमाप्रमाणें तूं गुन्हा केला आहेस का !

जयपाल—अचला ही माझी लग्नाची बायको असल्यानें तिच्याशीं केलेला व्यवहार व्यभिचार होत नाहीं.

कोर्ट—अचला आणि फिर्यादीचे साक्षीदार हे तूं अचलेशीं पुनर्लग्न केलेंस व नवराबायको म्हणून तुम्ही दोघंजणें राहत आहांत असें सांगतात त्याबद्दल तुझें काय म्हणणें आहे ?

जयपालः—ते खरी हकीकत सांगत आहेत.

कोर्टः—अचलेचं विलासाशीं लग्न झालेलं तुला होतं आहे ना!

जयपाल—होय.

कोर्ट—त्या लग्नाची कोर्टामार्फत काडीमोड झाली आहे कां!

जयपाल—नाहीं.

कोर्ट—फिर्यादीच्या साक्षीदारांची जास्त उलट तपासणी करावयाची आहे कां ?

जयपाल—नाहीं.

कोर्ट—बचावाचा पुरावा देणे आहे कां ?

जयपाल—नाहीं.

कोर्ट—तुला जास्त कांहीं सांगायचं आहे कां ?

जयपाल—होय. मला जें काय सांगायचं आहे तें मी लिहून आणलेलं आहे ते मी वाचून दाखवितों.

जयपालचें स्टेटमेंट.

फिर्यादी पक्षाचा जो पुरावा झाला आहे त्यांतल्या सर्व गोष्टी मान्य करून मी जबाब देतों. अचलेचें विलासाशीं लग्न झालेलें होतें, तिला कोर्टातून घटस्फोट मिळालेला नाहीं, तिच्याशीं मी लग्न केलें आणि अचला आणि मी नवराबायको म्हणून राहत आहोंत हीं सर्व विधानें सत्य आहेत, मला कबूल आहेत. ४९४ कलमांत ‘ नवऱ्याच्या संमतीनें घडलेला अगर नवऱ्यानें कानाडोळा केल्यानें चालू राहिलेला ‘ संबंध ’ व्यभिचाराच्या व्याख्येंत येत नाहीं खरा; परंतु तसा माझा बचाव नाहीं. विलासानें मला कधींच तशी संमती दिली नव्हती. अगर आमच्या एकत्र राहण्याकडे कानाडोळा केला नव्हता. माझा बचाव निराळाच आहे. पुरुषाला एकीच्या हयातींत अनेक लग्नें करण्याचा अधिकार असल्यामुळें विलासासारखे नराधम—

विलासाचा वकील—आमच्या पक्षकाराची बदनामी होत आहे.

कोर्ट—जयपाल तुम्ही वाचा पुढें! मिस्टर; आपण लक्षांत ठेवावे कीं

हा आरोपीचा जाच आहे. त्यानें वाटेल तें त्यांत लिहिलें असलें तरी तसें लिहिण्याची त्याला मुभा आहे.

पुढें वाचतो—पहिल्या बायकोला मारझोड करतात, कोंडून ठेवतात, भलभलत्या जागीं डाग देतात, घरांतून घालवून देतात, कुणी तिला थारा दिला तर त्याला भंडावून सोडतात, टाकून दिलेल्या बायकोचा ते अनेक प्रकारें छळ करतात. अशा टाकून दिलेल्या आणि नवऱ्याच्या जुलमांनीं गांजून गेलेल्या बायकांनाहि घटस्फोट घेता येईल अशी सोय असूं नये, अगर त्यांना नवऱ्याच्या हयातींत पुरुषाप्रमाणें पुनः दुसरें लग्न करण्याची मोकळीक असूं नये, हा उघड उघड अन्याय आहे. ह्या अन्यायी कायद्याचा भंग करण्यासाठीं आणि त्यायोगें स्वतःवर वाटेल ती कडक शिक्षा ओढवून घेऊन लोकमताला ह्या अन्यायाविरुद्ध चिथावण्यासाठीं मी जाणून बुजून हें कृत्य केलें आहे. व्यभिचार ह्याची इंडियन पिनल कोडांत केलेली व्याख्या त्याज्य आहे. लग्नाची बायको जिवंत असतांना विलासानीं उषेशीं प्रेमसंबंध ठेवला, व नंतर लग्न केलं तरी एकपत्नीत्वाच्या उच्चतत्वाच्या कसोटीला विलासाचें कृत्य गर्हणीय ठरेल, उषा विलासाचा संबंध व्यभिचारच ठरेल. त्या कलमांतलाच अर्थ घ्यायचा तर मी दोन प्रकारचा बचाव मांडतो. एकतर विलासानें अचलेला टाकून दिली तिच्या पोटापाण्याची वास्तपुस्तहि केली नाहीं, दुसरें लग्न करून पुनः संसाराची आशाहि तिची नष्ट केली, अचला आपली बायको राह्यली नाहीं असें कोर्टापुढें पूर्वी सांगितलें, तिनें नोटीस देऊन कळविलें असतांना कांहीं उत्तर दिलें नाहीं, ह्यामुळें अचला ही विलासाची लग्नाची बायको कायम राहत नाहीं. नवरा म्हणून विलासावर असलेली जबाबदारी त्यानें पार पाडण्याचें नाकारलें त्याबरोबर अचलाहि विलासाची बायको म्हणून तिच्यावर असलेल्या जबाबदारींतून मुक्त झाली. लग्नाचा हेतू आणि शपथा हेंच सांगतात कीं, पतिपत्नीचें धार्मिक, आर्थिक, वैषयिक साहचर्य साधावयाचें आणि तेंच जर कुणा एकाद्याच्या दुर्वर्तनानें अशक्य प्राय होईल तर तें आपोआप रद्दच समजलें पाहिजे. अशा स्थितींत ती असतांना मी अचलेशी लग्न केलं. ती त्यावेळीं नैतिक दृष्ट्या विलासची बायको राहिलीच नव्हती. पण ती अनाथ आणि निराधार झाली होती. मी तिच्याशीं रीतसर लग्न लावलें असल्यानें अशा पतीपत्नीच्या संबंधास व्यभिचार म्हणता यावयाचा नाहीं. ४९४ कलमांत असे आहे कीं 'दुसऱ्याची बायको

असल्याचें माहित असर आहे असें मानण्यास कारण असताना जो तिच्याशीं संबंध ठेवतो—वगैरे. ' मी अचलेशीं संबंध ठेवला त्यावेळीं ती विलासची बायको राहिली नव्हती. उलट माझी ती लग्नाची बायको होती. म्हणून व्यभि-चाराचा गुन्हा होत नाहीं असा माझा दुसरा बचाव होय.

हा माझा बचाव अन्यायी कायद्याच्या आजच्या कलमांना पटणार नाहीं, हे मी जाणून आहे. कायदे हे माणसांचे सुख साधण्यासाठीं माणसांनींच घडविलेले असतात. ते बदलण्याचा माणसांना अधिकार आहे. आणि जेव्हां जुलमी कायद्यांच्या बुजबुजाटानें शुद्ध न्याय आणि सदाचार ह्यांचा नायनाट होण्याची वेळ येते, त्यावेळीं त्या कायद्यांना मूठमाती देण्यासाटीं कुणाचे तरी बळी पडावे लागतात. मी हे कृत्य ह्याच हेतूनें केलें. शिक्षा भोगून मी बाहेर आलो, तरी सुद्धां मी ह्याच प्रकारचा कायदेभंग करणार, येवढाच माझा बचाव आहे. "

कोर्ट—शिक्षेबद्दल मी विचारणार होतों, परंतु आरोपीनें त्याबद्दलहि सांगून टाकलें आहे. त्याला पश्चात्ताप मुळींच झालेला दिसत नाहीं. मला वाटतें आपले हे भयंकर स्वरुपाचे सामाजिक गुन्हे दाबून टाकण्यासाठीं शक्य ती कडक शिक्षा मला द्यावी लागेल. बरं, आरोपीला अटकेंत घ्या. मी एक तासानें ठराव ऐकण्यासाटीं बोलावतो. '

न्यायाधीश आंत गेले, जयपाल अटकेंत अडकून पडला. कोर्टाच्या आवारांत लांब एका झुडपाच्या बुंध्याकडे तोंड करून आणि रहदारीकडे पाठ-फिरवून अचला अश्रू गाळीत बसली होती.

न्यायाधीशांनीं ठराव वाचून दाखविला.

जयपालाला पांच वर्षें सक्त मजुरीची शिक्षा झाली. न्यायाधीश निघून गेले, तमासगिरांची पांगापांग झाली. जयपालाच्या हातांत बेड्या पडल्या, त्याला शिपायी नेऊं लागले.

अचला डबडबलेल्या डोळ्यांनीं जयपालाकडे पाहत राहिली. मोकळ्या राहिलेल्या हाताच्या पंजानें खूण करून ' शांत हो, धीर धर', असे त्यानें तिला सुचविलें.

शिपायी तुरुंगाकडे जयपालाला घेऊन जाऊं लागले, त्यांच्या पाठोपाठ अचला चालूं लागली.

---

# १२

तुरुंगांच्या दारापर्यंत ती पाठोपाठ होती. जयपालानें तुरुंगाच्या दारांत शिरतांना मोकळ्या दुनियेकडे आणि चालून आलेल्या वाटेकडे वळून पाहण्यासाठीं म्हणून मागें पाहिले. त्याला अचला दूर अंतरावर उभी दिसली. जयपालनें दोन्ही हात जोडून तिला नमस्कार केला. अचलेनेंहि उलट नमस्कार केला. तुरुंगांचें दार उघडलें, बंद झालें, दाराच्या कोयंड्याचा खळ्ळ् आवाज झाला. अचला भानावर आली जड पावलानीं परत फिरली. गांवापासून ती त्यावेळीं जवळजवळ दोन मैल चालत आली होती.

ती गांवाकडे परत फिरली. ती आतां पार थकून गेली होती. गेले तीन दिवस तिनें तोंडांत पाणीहि घातलें नव्हतें. वाटेंत नदी होती, ती नदीकडे जाऊं लागली तो तिला पाठीमागून कुणाची चाहूल लागली, म्हणून तिनें वळून पाहिलें, किरात तिच्या पाठोपाठ येत होता. ती कांहींच बोलली नाहीं. नदीवर जाऊन पाणी प्याली आणि तिथेंच खडकावर बसली.

जयपालाला शिक्षा होतांच विलास घरीं गेला, व विलास उपेला घेऊन शोभाकडे आला आणि तीं तिघे जण मिळून किराताकडे आली. किरात भेटला नाहीं म्हणून तीं त्याला शोधायला निघालीं. विलासांनी पेढ्यांचे शिप्तर मोटारींत ठेवलें होतें. भेट कचेरीपर्यंत तीं तपास करीत आलीं तर त्यांना कळले, कीं अचला जयपालाच्या पाठोपाठ तुरुंगाकडे गेली आणि पाठोपाठ किरातहि जातांना दिसला, म्हणून तीं तिघेजण इकडेंच निघालीं होतीं.

ह्यावेळीं संध्याकाळ झाली होती, आणि रात्रीचा काळोख झाडेझुडपें आणि दऱ्याखोऱ्यांना व्यापून हळूहळू अलम दुनिया आपल्या पोटांत गिळून टाकूं लागला होता. नदीचें पाणी जास्त निळे आणि भेसूर दिसू लागले. सभोंवार एकदा अचलेनें न्याहाळून पाहिलें, ती भीतीनें दचकली. आतां ती एकटीच पडली होती, दुनियेंतल्या लहानमोठ्या आपत्तीना तिलाच एकटीला तोंड देणे भाग होतें. किरात काय म्हणतो ते ऐकण्यासाठीं तिचे कान उत्सुक होते.

" अचला ! आतां तूं एकटी कुठें राहाणार ! "

" मी माझ्या घरी राहीन. जयपालानीं माझ्यानांवानं एक घर घेऊन दिलं आहे, पोटापाण्याची त्यांनी तजवीज करून ठेवली आहे. विलासांनी जी व्यवस्था केली नव्हती ती ह्यानीं करून ठेवली आहे. "

" पण कुणाच्या आधारानं राहणार ! "

" दैवाच्या. "

" विलास तुम्हाला आणखीन त्रास देणार आहे. खटला भरणार आहे. शिक्षा करवणार आहे. "

" येवढंचना ! मला तेंच पाहिजे आहे. "

" पण मींच त्याला थोपवून धरलं आहे. तूं जर माझ्याजवळ राहशील तर कुणी तुझ्या केसालासुद्धां धक्का लावणार नाहीं. माझा अव्हेर करून केवढं प्राण संकट ओढवून घेतलं आहेस तूं. झाल्या गोष्टी विसर. माझ्याजवळ माझ्या आश्रयाला राह्यला चल. "

" लग्नाच्या बायकांना एक नवऱ्याचाच आसरा असतो. "

" पण जयपाल तर आतां पाच वर्षं तुरुंगांत राहणार. "

" किरात येथून चालता हो ! होतोस कीं नाहीं ! कां मी ओरडून माणसांना जमाकरूं. "

" ह्यावेळेला इकडे कुठली माणसं येणार ! "

" किरात निघून जा ! " अचला मोठ्यानें ओरडून म्हणाली. " नीचा !" हात धुवून जन्मभर माझा सूड उगवतो आहेस तरी अजून डोळे शांत नाही झाले तुझे ! मागें हो नाहींतर मी जीव देते. "

" थांब! अचले थांब!! किरात मागे हो." असे रागाचे ओरडणें लांबून ऐकूं आलें.

किरात मागे वळून पाहतो, तों विलास त्यांच्याकडे धांवत येत होता. पाठोपाठ उषा आणि शोभा धांवत येत होत्या.

किरात मागें सरकला, अचला दचकली, जागेवर उभी राहिली. आणि ओरडली. " मागें व्हा. पुढें कुणी याल तर ह्या डोहांत उडी घेईन."

विलास दूर अंतरावर उभा राहिला, उषा, शोभा त्याच्याजवळ उभ्या राहिल्या, किरात विलासांच्या जवळ येऊन उभा राहतांच त्यानें विचारलें.

" किरात काय भानगड आहे?"

" मी सांगते. हा मला वाईट मागणी घालीत होता. तुमचा मित्र आहे ना!" अचला म्हणाली.

" ही जीव द्यायला चालली होती. मी आडवीत होतों. ही खोटं बोलतें." किरातानें उत्तर केलें.

" आणखीन किरातांनीं तसं म्हटलं म्हणून तरी काय झालं? बाजारच जर मांडला आहे, तर किरातानीं तरी का कमी करावं असं विचारायला?" उषा म्हणाली.

" किरात कशाला म्हणायला बसले आहेत! ह्याच सोदीचं कुभांड असेल!" शोभा म्हणाली.

" अचला, परत फिर!" विलास म्हणाला.

" अन् कुठं चल?" उषेनें विलासाला विचारलें. " माझ्या घराचा उंबरठा नाहीं हो मी चढूं देणार."

" तुमचा कुणाचाच माझ्यावर अधिकार नाहीं." अचला म्हणाली.

" मग तूं काय करणार?" विलासानें विचारलें.

" मी जीव देणार. उगीच माझा जीव होत नव्हता. तुम्ही आलांत मला त्वेषामुळें धीर आला. मी आतां कुणाची नाहीं. ज्यांची होते ते तुरुंगांत आहेत. मी आतां उडी घेणार, जय गंगे, हर नर्मदे, सूड घेणाऱ्याचे डोळे आतां तरी थंड होऊं देत."

असें म्हणून अचलेनें नदींत उडी टाकली. किरात धांवून जाणार पण

त्याला शोभानें गच्च धरून ठेवलें. विलास धांवूं लागला त्याच्या कमरेला विळखा मारून उषानें त्याला अडविलें.

किरात—सोड सोड. ती मरेल. तिला काढून दे बाहेर.

शोभा—खुश्शाल मरूं दे. एवढी खेटरं पडलीं तरी लोचटपणा जातो आहे कां !

किरात—माणसाचा जीव वांचवला पाहिजे.

शोभा—सुरेख बाईचा, तरुण बाईचा म्हणा! मरूं दे. खुश्शाल मरूं दे.

किरात—केवळ सूडानं तूं हे बोलतेस. सोड सोड.

शोभा—तुम्ही तरी सूड उगविण्यासाठीं तिला वांचवायला पाहतां.

किरात—सोड सोड. दोनदां ती वरती आली, आतां तिचा प्राण जाईल.

शोभा—माझा प्राण गेला तरी मी सोडणार नाहीं.

आणि दुसरीकडे ह्यावेळीं विलास आणि उषा यांची अशीच झटापटी चालली होती.

विलास—सोड सोड ! ती बुडते आहे.

उषा—बुडूं दे. खुश्शाल मरूं दे,

विलास—माझी बायको बुडून मरते आहे. मी तिला सोडवणार, सोड, सोड नाहीं तर मी नरडी फोडीन.

उषा—माझं नरडं दाबा, मग माझ्या सवतीला काढा. मी जिवंत आहे तोंवर तिला मी कांही झालं तरी जिवंत काढून देणार नाहीं.

विलास—मला तिला वाचवलं पाहिजे.

उषा—कशाला ! घरांत आणायची असेल नांदायला माझ्या उरावर.

विलास—नाहीं. मला तिच्यावर सूड उगवायचा आहे. मी तिचं नरडं दाबून खून करून माझा पण पुरा करणार आहे. सूड सूड! पूरा सूड घेणार आहे.

उषा—तिचं नरडं दाबून आपली मान फासांवर लटकेल ती! मी कांहीं इतकी खुळी नाहीं. तिला मेलेली पाह्यची आहे ना! तिच्यावर सूड घ्यायचा आहे ना ! मग मरूं द्या खुश्शाल.

विलास—नाहीं तरी आतां काय येवढा वेळ ती जिवंत राह्यली असेल. सोड मी नदीकडे जात नाहीं.

उषा—नाहीं सोडणार.

विलास—मी नदीकडे जात नाहीं. सोड. वेड्यासारखं काय करतेस.

किरातची धडपड थंड पडली होती. तो विलासला म्हणाला. "आतां जिवंत राह्यली नसेल."

"छेः ! बरं झालं मी सुटलों ह्या पापांतून." असें म्हणून विलासानें हायसा सुस्कारा टाकला.

"आणि बया यातेंतली गेली. आतां कांहीं तरी मार्ग सुचेल !" शोभा म्हणाली.

"कितीतरी जीव आज निर्धास्त झाले ? माझी काळजी दूर झाली." उषा म्हणाली.

"हूंः गरीब होती अचला. दुर्दैव कीं आम्ही एकमेकांला ओळखलं नाहीं." किरातानें सुस्कारा टाकला.

"अन् मी सांगते, आतां उगीच चाळवाचाळव मी चालूं देणार नाहीं." शोभा किराताला म्हणाली.

"चला, आपणाला आतां हिथून गुपचुप परत गेलं पाहिजे. उद्यां तिचं प्रेत तरंगत बाहेर आलं म्हणजे खुनाचा आरोप येईल आपल्यावर, चला." विलास म्हणाला आणि त्यानें सर्वांना मोटारीजवळ आणलें.

ह्यावेळीं काळोख मिट्ट पडला होता.

सर्व मंडळी विलासाच्या हिथें जमा झाली. आज सर्वांचाच आनंदाचा दिवस होता. पेढ्याचे शिप्तर सोडलें आणि पेढ्यांवर तांव देत हांसत खेळत असतां विलास म्हणाला.

"किरात अन् शोभाबाई उद्यांच शुभमुहूर्तानं तुमचा पुनर्विवाह करून टाकूं. शोभाबाई तुम्ही आतां जयपालाची आशा ठेऊं नका अन् किरात तुम्हीही आतां अचलेची आशा ठेऊं नका."

"ह्यांनीं कबूल केलं पाहिजेना !" शोभाबाईनीं किराताकडे पाहून लाजत म्हटलें.

"आणखीन आमची मागणी ह्यांनीं कबूल केली पाहिजे ना !" किरात म्हणाला.

आणि इकडे तुरुंगांत जयपाल अंथरुणावर बसून आढ्याकडे शून्य दृष्टी लाऊन, अचलेच्या भवितव्यतेविषयीं काळजी वाहत होता, मधूनमधून डोळे टिपीत होता, रात्रभर तो तसाच बसून राहिला होता.

त्याला कुठून समजणार होतं ! कीं विधिघटनेनें अचलेच्या भवितव्यते-बद्दल अखेरची व्यवस्था करून त्याची काळजी दूर केली होती. दुसऱ्या दिवशीं कामांतून मोकळा होण्याच्या अगोदरच पोलीस तपासाला आलें. अचलेनें आत्महत्या केली, ही बातमी ऐकतांच त्यानें कपाळावर जोरानें हात मारून घेतला " अचलेचा बळी घेऊन समाजानें आम्हावर असा सूड घेतला आं ! दुनियेंत न्याय सांपडेल कां ! " आणि आपल्या कोठडींत जाऊन कांबळयाच्या वळकटीवर मान टाकून तो सचिंत बसला.

---